प्रकाशक व मुद्रक:
लक्ष्मण सखाराम केळकर,
जनार्दन सदाशिव लि. प्रेस,
३९४ सदाशिव पेठ, पुणें नं. २.

  






## मिळण्याचीं मुख्य ठिकाणें.

जनार्दन सदाशिव लि.
३९४ सदाशिव पेठ,
पुणें नं. २

मुंबईस फक्त बुकसेलर्सकरितां
सदाशिव हरी मोडक, बी.ए.
काळाराम मंदिर, ठाकुरद्वार
मुंबई नं. २

# निवेदन

तीन वर्षांपूर्वी व्यवसायानिमित्त उज्जयिनीस आल्यापासून येथें प्रचलित असलेल्या हिंदी भाषेंतील वाङ्मय वाचण्याचा उपक्रम सुरू केला. तसें करण्यांत परभाषेंतील वाङ्मयाकृतींचा रसास्वाद घेण्याचा जसा हेतु होता तसेंच मराठी वाङ्मयाच्या तुलनेंत त्या कृती कितपत उतरतात हें पाहण्याची कुतूहलपूर्ण इच्छा हेंहि एक त्यास कारण असावें. परंतु अशा कांहींशा तुलनात्मक दृष्टीनें वाचतांनाहि निरपेक्षतबा तशीच एखादी सुंदर ललितकृति आढळल्यास तिचें मराठींत भाषांतर करून मराठी वाचकांपुढें ठेवावें हीहि दृष्टि ठेविली होती व तदनुसार प्रस्तुत प्रयत्न केला आहे.

भाषांतर म्हटलें कीं मला विष्णुशास्त्र्यांच्या एका दृष्टांताची आठवण होते. अत्तर एका कुपींतून दुसऱ्या कुपींत ओततांना त्याचा थोडासा तरी वास उडून जातो. तसेंच भाषांतराचें. मूळ कृतींतील रस भाषांतरांत पूर्णपणें उतरणें जवळजवळ अशक्य. या दृष्टीनें श्री. जैनेन्द्रकुमार यांच्या मूळ हिंदी कादंबरीच्या मानानें भाषांतर किंचित् कमी प्रतीचें ठरेल. तथापि मूळ कृतींतील रसाचा वास शक्य तितका कमी उडून जावा अशी काळजी घेतली आहे. जवळजवळ रसा-इतकीच महत्त्वाची दुसरी गोष्ट म्हणजे भाषाशैली. श्री. जैनेन्द्रकुमार यांची भाषाशैली जितकी साधी व सरळ आहे तितकीच बंडखोर ( Unconventional ) असून तिला हिंदी वाङ्मयांत एक विशिष्ट स्थान आहे. हा त्यांच्या लेखनाचा विशेष भाषांतरांत उतरला नाहीं तर तो त्यांच्या बाबतींत अन्याय होईल असें मला वाटलें. म्हणून

शक्य तों त्यांची विशिष्ट भाषाशैली मराठींत कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळें कांहीं ठिकाणीं मराठी वाक्यरचना कांहींशी शिथिल झाल्यासारखी वाटते आणि कानाला चमत्कारिक लागते हें मला माहीत आहे. परंतु मूळ लेखकाच्या भाषाशैलीचें वैशिष्ट्य कायम ठेवणें आणि मराठी भाषापद्धतीला अजीबात बाध येऊं न देतां वाक्यरचना साधणें या दोन्ही गोष्टी मला साधूं शकल्या नाहींत हें प्रांजलपणें मान्य करतों.

भाषांतर करीत असतांना माझे सहाध्यापक प्रो. प्रभाकर माचवे यांचे मला बहुमोल साहाय्य झालें. त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

उज्जयिनी
ता. २० मार्च १९३९

सर्वांचा नम्र,
अ. म. जोशी.

---

# परिचय

'त्यागपत्र' कादंबरीचा व तिच्या मूळ हिन्दी लेखकाचा परिचय करून देण्याचें काम अनुवादकांनीं मला दिलें आहे. हिन्दी भाषेंत मी त्या लेखकावर 'जैनेन्द्रकुमार : एक व्यक्तित्व–चित्र' या नांवानें 'हंस' (नोव्हेंबर १९३६) मासिकात, तसेंच 'जैनेन्द्र के विचार' या निबन्धसङ्ग्रहाच्या प्रस्तावनेच्या रूपानें, असे दोन स्वतंत्र लेख लिहिले आहेत. ज्यांना हिन्दी समजतें, त्यांनीं मूळांतच या लेखकाच्या कृति व त्यावरील समीक्षा वाचल्या तर अधिक उत्तम; पण ज्यांना मराठींतच माहिती पाहिजे आहे अशा लोकां-करितां मराठींतच संक्षिप्त परिचय करून दिलेला बरा, या हेतूनें मी हें काम कबूल केलें. दुसरें असें कीं प्रान्तीय भाषांतील साहित्यसंबंध अधिकाधिक जवळचे व जिव्हाळ्याचे होत गेले पाहिजेत व त्या दिशेने जेवढा कांहीं प्रयत्न होईल तो स्वागतार्ह, अशी माझी ठाम समजूत आहे.

हिन्दी भाषेंतील वाङ्मयाला, स्वतःच्या व्रज–प्रान्तांतील बोलीचा संकुचितपणा सोडून, अखिल हिन्दी राष्ट्राच्या आकांक्षा व्यक्तविण्याचें सामर्थ्य आपल्यांत आहे अशी जाणीव विसाव्या शतकांत उत्पन्न झाली. स्वर्गीय आचार्य द्विवेदीजी, 'प्रेमचंद' आणि जयशंकर 'प्रसाद' या लोकांनीं हिन्दी वाङ्मयास विशेष सकस आणि स्वयम्पूर्ण बनविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. भाषा–प्रचार व साहित्येतिहास संशोधन इत्यादि कार्य इतर मंडळींनीं व संस्थांनीं चालविलें होतेंच. महायुद्धाबरोबर हिन्दी साहित्यांतील राष्ट्राच्या आकांक्षांत आणि त्याबरोबरच हिन्दी साहित्यांतील जीवनविषयक दृष्टिकोणांत

सुद्धां विलक्षण बदल घडून आला. जे प्रश्न पूर्वी केवळ राजनैतिक स्वरूपाचे वाटत होते, ते आतां आर्थिक व नैतिक स्वरूपाचे वाटूं लागले; जें वाङ्मय पूर्वी पुस्तकी पांडित्यपूर्ण व पढिकांपुरतेंच ( Academic ) स्वरूपाचें होते, तें अधिकाधिक सामाजिक म्हणजे प्रत्यक्ष जीवन–निगडित बनूं लागले. याचेंच स्पष्ट प्रमाण म्हणजे लोकमनाची पकड घेणाऱ्या कथाप्रकाराचा झपाट्यानें विकास होऊं लागला व पूर्वीचा तो शास्त्री थाटाचा आव हास्यविषय होत गेला; स्वप्नाळू रोमान्सप्रियतेऐवजीं बुद्धिपुरस्सर प्रज्ञास्वातंत्र्याचा जागृत निर्घोष कानीं पडूं लागला.

समाजजीवनांतील जुन्या मूल्यांच्या या झपाट्याच्या परिवर्तनाचें श्रेय राजकारणी महात्म्यांना तसेंच विचारक कलावंतांना व वैज्ञानिक सुधारकांना, अशा नाना प्रकारच्या ज्ञात व अज्ञात व्यक्तींना व कर्मशक्तींना आहे. भारतवर्षाच्या दृष्टीनें कांहीं अंशीं जसें गांधींना तसेंच संयुक्तप्रान्ताच्या दृष्टीनें या लोकजागृतीचें व समाजक्रांतीचें बरेंचसें श्रेय प्रेमचंदांना द्यावें लागेल. जैनेंद्रकुमार हे हिंदी वाङ्मयांत प्रेमचंदाच्या आत्मस्फूर्ति ( Spirit ) चे खरेखुरे वारसदार आहेत, हें सांगितलें म्हणजे प्रस्तुत कादंबरीकाराचें भारतीय साहित्याच्या ऐतिहासिक परंपरेंतील नेमकें स्थान हुडकून काढलें, असें मानण्यास हरकत नाहीं.

जैनेंद्रकुमार या तरुण लेखकाचा जीवनविषयक दृष्टिकोण सांगण्यापूर्वी त्यांच्या तात्विक भूमिकेचा परिचय आवश्यक आहे. सुरवातीसच हें सांगितलेलें बरें कीं ते कोणतेही ‘ वादी ’ नाहींत. प्रेमचंदांचें लेखन सुद्धां तसेंच होतें. आणि शरदबाबूंचीहि तीच गोष्ट. अलीकडे कपाळावर मतप्रचाराचें एक लेबल लावून आपला

लिखितमाल खपविण्याची जी पद्धत वाढत चालली आहे, त्यांत त्यांना खेंचतां येणार नाहीं. याचा अर्थ असा मुळींच नव्हे कीं, त्यांची स्वतःचीं मतनिश्चिती अशी मुळींच नाहीं, किंवा त्यांना सांगावयाचें असें कांहींच नाहीं. ते भ्रमिष्टाप्रमाणें विचारांच्या गुंतवळींत स्वतःला गुरफटून घेत आहेत, व दुसरें म्हणजे त्यांना 'नवीन' (?) असें कांहींच सांगावयाचें नसल्यामुळें त्यांच्या आल्हाददायक भाषाशैलीचा चटकन डोळ्यांत भरणारा विशेषच वाचकांना मोहून घेतो, अशा तऱ्हेचे आक्षेप त्यांच्या लेखनावर हिन्दीतील समीक्षकांनीं लावलेले आहेत. परंतु भाषापद्धतींतील साधेपणा जसा गांधींच्या लेखनशैलीचा प्रभाव म्हणून चटकन ओळखतां येइल तसें त्यांच्या विचारांचें नाहीं. त्यांनीं आजकालच्या सर्वच जाडयाजुडया व आधारणीय मानल्या जाणाऱ्या समाजशास्त्रज्ञ व साहित्य शास्त्रज्ञ व तत्वज्ञ लोकांप्रमाणें स्वतःची विचारबुद्धि पुस्तकप्रामाण्याला गहाण टाकलेली नाहीं. तद्वतच खूप पुस्तकी अध्ययनांतून ती स्वतःची विचारदृष्टि कमावलेली सुद्धां नाहीं. त्यांनीं जीवनाचें निरीक्षण व निमज्जन स्वतःच्या डोळ्यांनीं केलें आहे, पुस्तकी भिंगांतून किंवा कल्पनाजीवी विस्मृतिवादा ( Escapist ) च्या विकृत, कृत्रिम, दुर्बिणींतून केलेलें नाहीं. जीवनाचें प्रत्यक्ष–दर्शनच सोप्या शब्दांतून जिवन्तपणें व्यक्तविलें हीच त्यांच्या कलाकृतींतील व विचारांतील महनीयता. याकरतांच त्यांनीं सिद्धान्त उपदेशिले नाहींत. 'कला जीवनाकरितां पाहिजे किंवा कलेकरताच पाहिजे' असली कोणतीहि हाकाटी केली नाहीं. कारण त्यांच्या मतें कला जीवनापासून विच्छिन्न आणि विभिन्न नाहींच मुळीं, तेव्हां ती जीवननिरपेक्ष जगूंच शकत नाहीं. कला आणि जीवन यांतील अन्तर मौलिक नाहीं, अन्तर असलेंच तरी तें केवळ शाब्दिक व कल्पनाप्रसूत होय, असें त्यांना वाटतें.

म्हणूनच या कादंबरींत त्यांनीं फक्त एक 'गोष्ट' सांगितली आहे, जींत समाजांतील एक जळत्या प्रश्नाचा विचार आपोआप निहित झालेला आहे. ते शरदबाबूंच्या 'देवदास' प्रमाणें व्यक्तिगत सुख-दुःखाच्या भावनाप्रधान हेलकाव्याबरोबर वाहवलेहि नाहींत, कीं उल्कें-प्रमाणें ' एकच मिणमिणत्या पणती ' च्या उजेडांत समाजाची चिर-फाड करीत बसले नाहींत. बुद्धदेव बसूंच्या ' आनंदा ' प्रमाणें आठ प्रियकरांची सृष्टि करून स्वतःस ' प्रवासी ' ' मुक्तात्मा ' कल्पून ' यौवन आमार अभिशाप ' म्हणून विव्हळत बसणें, किंवा, स्वतःला अमुक एक विशिष्ट मतप्रचाराचा शिक्का लावून घेऊन मनोवि-श्लेषशास्त्रगत अमुक-एक अनिर्णित व प्रयोगावस्थेंतील सत्याच्या आविष्करणाची जबाबदारी स्वतःवरच आहे असें समजणें, यापैकीं एकहि गोष्ट त्यांना आवश्यक वाटली नाहीं. आजच्या समाजव्यव-स्थेंतील स्त्रीजीवनपर एक साधा प्रश्न त्यांनीं हाताळला आहे. दोनतीन पात्रांच्या या लहानग्या संसारांतील गोष्टींकरतां त्यांना अमेरिकन लेखनव्यावसायिकांचीं पुस्तकें चाळावीं लागलीं नाहींत, कीं प्रो. फडके यांच्या प्रसाधनांचा उपयोग उसना घ्यावा लागला नाहीं.

तो जळता प्रश्न तुम्हांआम्हांला, समाजांतील प्रत्येक लहान-मोठया घटकाला जाचीत असतो. तो प्रश्न म्हणजे, ज्याला आम्ही समाजप्रतिष्ठा म्हणतों, समाजमान्य अशा न्याय-अन्यायाच्या धर्म-काट्यांवर तोलून-पारखून ज्याला फुंकून-फुंकून चालणारी जीवन-नीति मानत असतों, ती जीवननीति खरोखरीच मानवी आहे काय, ती प्रतिष्ठा खरोखरीची तरी आहे का, मानव-मानवांच्या अंतरंगां-तील आत्मव्यथेच्या सत्याची गळचेपी करून आम्ही कुठवर आप-ल्याच समाजांतील विभेद व आणखी आणखी विभेद न् आपल्याच हातून असे निर्मीत जाणार ? कुठवर आम्हीं या बेगडी संस्कृतीचा

बडिवार माजवीत सुटणार ? या असल्या कृत्रिम समाजव्यवस्थेमुळें होणारी मानवी मनाची कुचंबणा बंद पाडून, ही समाजव्यवस्था बदलून नवीन मानवी–सर्वथैव मानवी–मूल्यांची (Human values) प्रतिष्ठापना आम्हांला करावयास नको काय ? आणि म्हणूनच प्रस्तुत कादंबरींकारानें या प्रश्नास दिलेलें उत्तर कोणत्याहि सच्चा कलावंताला शोभणारें असें विवेकाश्रित भावनांच्या सखोलतेंतून उन्मळलेलें उत्तर आहे– 'आज समाजासमोर प्रश्न जरी आर्थिक किंवा धार्मिक स्वरूपाचा वाटत असला तरी मूळ प्रश्न पैशाचा किंवा परमेश्वराचा नसून तो मानवांचा आहे; मानवानें मानवास प्रथमतः मानव आणि नंतर गरीब किंवा श्रीमंत, पापी किंवा पुण्यवान मानून जगण्याचा आहे.' आजच्या समाजांतील दुर्व्यवस्था मनुष्य माणुसकी विसरल्यामुळेंच उत्पन्न झालेली आहे. व ही माणुसकी अर्थमूल्यांच्या पायलीनें किंवा 'डायलेक्टीशियन्स'च्या तर्कटांनीं मापतां येणार नाहीं. ती माणुसकी एक अत्यंत सूक्ष्म पण अथांग अशी भावना आहे. ती भावना शुद्ध स्वरूपांत ग्रहण करावयास हवी.

ही भावनाशुद्धि जीवनांतील अगदीं पहिली आवश्यकता आहे. तिच्या पाठोपाठ व लगोलगच संकल्प, आकांक्षा, बुध्दि आणि कर्म हे सर्व अधिकाधिक विवेकाश्रित अर्थात् प्रगत होत जातात. तीच गोष्ट आणखी सोप्या शब्दांत मांडावयाची झाल्यास असें म्हणतां येईल कीं, मला सुखी व्हावयाचें आहेना, तर 'माझें सुख' या शब्दप्रयोगाला, जोंवर माझ्या सभोंवतीचे व स्वबाह्य असें जग किंचिन्मात्रहि दुःखी आहे तोंवर कांहीं अर्थच उरत नाहीं. जोंपावेतों माझा शेजारी (माझा समाज, माझा देश, माझें जग) सुखी नाहीं तोंवर मी सुख मानणार तरी कोणाबद्दल ? कारण मी ज्याला 'मी-

पण ' म्हणून संबोधतों तें भोंवतालच्या सामाजिक जीवनापासून वेगळें नाहीं, उलटपक्षीं तीं दोन्हीं अङ्ग्लङ्गिभावानें (The part and the whole ) परस्परावलंबित आहेत. त्याबरोबर हेंहि तितकेंच खरें आहे कीं जगांतील सर्व दुखांचा निस्तार पूर्णपणें आजपावेतों झाला नाहीं व पुढेंहि तो होण्याची आशा अशक्यप्राय, मग या जागतिक दुःखाच्या चक्रव्यूहांतून सुटका व समाधान बुद्धांच्या ' निब्बाणा ' प्रमाणें किंवा उमरखय्यामच्या ' शून्यवादा ' प्रमाणें नुसत्या नकारात्मक अशा निराशावादींत नसून, ' सर्वांभूतीं ईश्वर ' ही जी जुनी संत–उक्ति तदंतर्गत मानवतेबद्दल अखंडप्रेम आणि त्याबद्दलच अचळ श्रद्धा, व त्या श्रध्देनें प्रेरित आशावादीपणें कर्तव्याची जाणीव ठेऊन कर्मसातत्य यांत तें समाधान सांपडेल,अशी थोडक्यांत जैनेंद्रकुमारांच्या जीवनविषयक दृष्टिकोणाची भित्ति आहे.

नैतिक मूल्यांच्या मूल्यांतरींकरणा ( Transvaluation )बरोबरच नवी होणारी समाजव्यवस्था सर्वस्वीं भौतिक व अनीश्वरपूर्ण असली पाहिजे असला आग्रह तर्कसंगत नाहीं. कारण केवळ भौतिकत्व असें जगांत कोणतेंहि तत्व शक्य नाहीं. भौतिक द्रव्याचा ( matter ) स्वभावच मुळीं अनंत तृष्णा, किंवा नव्या वैज्ञानिक परिभाषेंत बोलावयाचें झाल्यास त्रिकालाबाधित गतिमानता Timeless Motion असा आहे. तृष्णा कशाची व गति कोणीकडे हे प्रश्न पुढें साहजिकपणें येतातच. आणि येथेंच भौतिकास अभौतिकाची, शास्त्रास काव्याची, बुध्दिवादास भावनेची व जडवादास गूढवादाची बैठक पाहिजेच असें वाटूं लागतें. येथें साहित्यसमीक्षक चटकन म्हणतील कीं ही तर ' हेंहि पाहिजे व तेंहि पाहिजे ' असली निव्वळ केळकरी झाली, तर त्याला उत्तर हेंच कीं, जो तत्त्वज्ञ लेखक आहे तो केवळ अनित्य मल्यांनीं भारावून एका किंवा दुसऱ्या टोंकास पोंचणारा

अतिवादी ( Extremist ) बनूच शकत नाहीं. नित्यानित्य मूल्यांचे आकलन ' अनेकान्त ' होऊनच करतां येऊं शकतें. सर्वसंग्राहक दृष्टि तेव्हांच मिळवितां येते. ' अनेकान्त' व लेखकाच्या नांवातील 'जैन' शब्दावर वाचकांनीं भ्रम करून घेऊं नये ही इशारत शब्दांचा कींस काढणाऱ्या कोटिलोलुप महाराष्ट्रीय वाचकवर्गाला देणें येथें आवश्यक आहे.

टॉलस्टॉयसारखी ही मानवतावादी ( Humanitarian ) दृष्टि आमच्या मार्क्सिस्ट मंडळींना ' गांधाळ ' वाटेल. पण राजकारण वेगळें ठेवलें, तरी वाङ्मयक्षेत्रांत मला त्या ' भाई 'ना एवढीच सूचना द्यावीशी वाटते कीं टॉलस्टॉय व डॉस्टॉफेस्कीप्रभृतींनीं पार्श्व-पीठिका तयार करून ठेवली नसती तर त्यांतून गॉर्की किंवा सॉलो-खाफसारखीं चित्रें निर्माण झालीं देखील नसतीं, व तीं निर्माण झालीं असतीं तरी इतकीं खुलून पुढें तर आलीं नसतींच. तात्त्विक इतिहासाच्या अभ्यासकाला सामाजिक मनाच्या विकासासाठीं क्रिया, प्रतिक्रिया व नंतर दोहोंच्या जुळणीनें निघणारी नवनीततुल्य संश्लिष्ट ध्येयप्राप्ती, या सर्व पायऱ्या अत्यंत महत्त्वाच्या आहेत. एक जरी पायरी चुकली तरी निष्फल अराजकच निपजावयाचें.

हिंदी कथाक्षेत्रांत जैनेन्द्रकुमार या लेखकाचा उदय ' परख ' या लघुकादंबरीनें झाला. नंतर आतांपावेतों त्यांच्या तीन कादंबऱ्या व पाऊणशें–शम्भरावर गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांचे चार–पांच नेटके संग्रह देखील प्रकाशिले गेले आहेत. ' परख ' या कादंबरीबद्दल ' हंस ' मासिकांत प्रेमचंदांनीं परीक्षण करीत असतांना लिहिलें–' या पुस्तकांत अन्तःप्रेरणा व दार्शनिक संकोच यांचा संघर्ष दिसून येतो. हा संघर्ष इतका अंतःकरणास पिळवटून टाकणारा, स्वच्छन्द आणि निष्कपट आहे कीं जणूं बंधनांनीं जखडलेल्या

आत्म्याची हांकच...त्यांच्या लेखणींत साध्याहि विषयाला अशा कांहीं रीतीनें मांडण्याची खुबी आहे कीं मन तात्काल आकर्षिलें जातें. त्यांच्या भाषेंत तर विलक्षण लवचीकपणा व शब्दसंधान आढळतें.' नंतर दुसरी कादंबरी 'सुनीता'. त्यांतील प्रास्ताविकांत लेखकाचें स्वतःचें एकपानी वक्तव्य:'...पुस्तकांत मी मोठी लांबलचक गोष्ट वळीत बसलों नाहीं. फक्त गोष्टी सांगत बसणें, हा माझा उद्देशहि नाहीं. म्हणूनच तीन–चार पात्रांनींच माझें काम भागलें आहे. या विश्वांतील लहानांत लहान खंडाला आधार मानून आम्ही आपलें चित्र रेखाटूं शकतों व त्यांतून सत्यदर्शन करवूं शकतों. कारण जें पिंडीं तें ब्रम्हांडीं. म्हणून माझ्या चित्राला मला मोठ्या 'कॅन्व्हास'ची गरज भासली नाहीं. थोडक्यांत सर्व कां न दाखवितां यावें?' आणि आतां त्यांच्या तिसऱ्या कादंबरीवर–'त्यागपत्रा'वर –प्रेमचंदांचे चिरंजीव व हल्ली 'हंस' मासिकाचे संपादक 'सुशील' या टोपण नांवानें लिहितात– 'या कहाणींत मानवी वेदनेचें महत्त्व मोठें सुंदर चितारलें आहे. या कहाणींत आत्म्याचें उन्नयन करण्याची शक्ति आहे. सबंध गोष्ट मोठ्या वेगानें प्रस्तुत केली आहे. जणूं मनाला स्तम्भित करून व हृदयास अशान्त करूनच ही गोष्ट एकदम संपते. या वेगमय चित्रणांत सरितेचें स्थैर्य नाहीं तर वन्यनिर्झराचें चापल्य आहे.'

शेवटीं, जैनेन्द्रकुमारांच्या या मृणालआत्याच्या चरित्रचित्रणांत कुणास भाग्यवादाच्या उदासीन व अगतिक ( Deterministic ) संदेशाचा वास येऊं नये, ही इशारत देणें जरूरीचें वाटतें. कारण मृणाल आत्याच्या जीवनाला आधारभूत मानून लेखकानें जीवनाचें प्रतीकीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे, व तो मोठ्या मार्मिकपणें त्याला साधलेलाहि मला वाटतो. कारण शं. बा. शास्त्री यांनीं भावानु-

वादिलेल्या ‘ नवी क्षितिजें ’ तील ‘ आशे ’ इतकी मृणाल तडफदार नसली तरी ‘ भंगलेलें देऊळ ’ किंवा ‘ सुकलेलें फूल ’ या कादंबऱ्यांतील नायिकांसारखी ती कृत्रिम कीं रडवी मुळींच नाहीं. ती स्वाभिमानी आहे. तिचें जीवन म्हणजे संस्कारांबरोबर तिच्या मनानें घेतलेली जोराची झुंज होय. त्या द्वंद्वयुद्धांत झालेला तिचा पराजय व क्षय जगन्मान्य अशा दम्भी न्यायीपणावर झगझगीत प्रकाश पाडणारा आहे.

वस्तुतः जैनेन्द्रजींच्या विचारक्षेत्रांत घर आणि घराबाहेरचें विश्व, व्यष्टि आणि समष्टि, दोन्ही परस्परापेक्षाशील दिसून येतात— जणूं एकावांचून दुसऱ्याचें अस्तित्वच शक्य नाहीं. तरीसुद्धां भारतीय संस्कृतींतील जें त्यागद्वारां आत्मशान्तिचें व ‘ वसुधैव कुटुम्बकम् ’चें तत्त्वज्ञान तेंच त्यांच्या घराबाहेरच्या जगाविषयींच्या विचारावर कुरघोडी करतांना दिसून येतें. त्यांच्या कलेला विचारांची जबरदस्त जोड असल्यामुळें त्यांचे लेखन कैक ठिकाणीं गूढ, रुक्ष व सामान्य वाटतें. व विशेषेंकरून सवंग चुरचुरीत प्रेमकथांना चटावलेल्या महाराष्ट्रीय वाचकवर्गाला तर असली कथा—कला कदाचितच रुचेल—पचेल. परंतु जे खरोखरीचे पुरोगामी व सहृदय लेखक व वाचक असतील, ते याहि दृष्टिकोणाचा आस्थापूर्वक व प्रेमपूर्वक स्वीकार करतील अशी मला आशा वाटते.

अनुवादाचें काम वाटतें तितकें सोपें तर नाहींच, उलट मोठ्या जबाबदारीचें व कष्टाचें आहे. श्री. जोशी व मी तासन्तास एखाद्या शब्दाला हुबेहूब प्रतिशब्द मिळविण्याकरितां डोकें खाजवीत बसत असूं, त्याची आठवण आली कीं मला या गोष्टीची जास्तच प्रचीती पटते. आधीं प्रत्येक भाषेची आपापली भाववाहनक्षमता व वाक्यरचनापद्धति वेगवेगळाली, व त्यांत या लेखकाची ही असली अनिर्बंध भाषाशैली. तरी अनुवादकांनी मूळचें स्वारस्य बरेंच शाबूत राखिलें आहे असें मला वाटतें.

हिन्दी, बंगाली, गुजराथी व मराठी या चार भाषा तर फारच निकटच्या–सख्या बहिणींप्रमाणें आहेत. आणि म्हणूनच यांच्या साहित्यसंसारांत जितकी परस्पर देवाण–घेवाण वाढेल तितकी पाहिजेच आहे. आज आम्हीं हिन्दी लोकांनीं प्रान्तीयतेचें कपमंडूकत्व सोडून, खुल्या मनानें व मोकळया स्मितानें शेजाऱ्यांच्या आतिथ्यासाठीं व त्यांना स्वतःचा परिचय करून देण्यासाठीं उद्युक्त झालें पाहिजे. या राष्ट्रीय कर्तव्यांत कुचराई किंवा दिरंगाई आतां उपयोगी नाहीं.

— प्रभाकर माचवे.

---

# प्रास्ताविक

सर पी. दयाल हे ××× प्रांतांत चीफ जज्ज होते आणि त्या जागेचा राजीनामा देऊन गेलीं कित्येक वर्षें हरिद्वारला विरक्त जीवन कंठीत होते. सुमारें दोन महिन्यांमागें त्यांच्या मृत्यूची बातमी वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली होती. पुढें त्यांचे कागदपत्र चाळतांना स्वतःच्या हस्ताक्षरांनीं लिहिलेल्या कागदाचें एक पुडकें सांपडलें. ती आत्मकथा होती व त्यांतील कांहीं उतारे सारांशरूपानें वर्तमानपत्रांत प्रसिद्धहि झाले होते. मूळ लेख इंग्रजींत होता. त्याचें भाषांतर वाचकांपुढें ठेविलें आहे.

कथेंतील कांहीं स्थळें आणि व्यक्तींचीं नांवें, त्याप्रमाणें इतर कांहीं सांसारिक गोष्टी अनिवार्य न वाटल्यामुळें गाळून टाकल्या आहेत किंवा त्यांत थोडासा बदल केला आहे.

# त्यागपत्र



........नाहीं बाबानों, पाप-पुण्याचा निर्णय माझ्यानें होणार नाहीं ! मी न्यायाधीश आहे; कायद्याच्या तराजूची मर्यादा मी जाणतों. ती तराजू आवश्यक आहे हेंहि मी ओळखून आहे. म्हणूनच मी म्हणतों कीं ज्यांच्यावर धारवाडी कांट्यानें पापपुण्य जोखून पापी मनुष्याला पापी ठरवून त्याची योग्य ती व्यवस्था लावण्याची जबाबदारी आहे, ते काय करीत असतील हें त्यांचें त्यांना माहीत, माझ्यानें मात्र तें होत नाहीं ! माझी आत्या पापिणी नव्हती असें म्हणणारा तरी मी कोण ? परंतु अजून एकटा असलों म्हणजे तिच्या आठवणीनें डोळ्यांतून टपाटप आंसवें गळतात. आज मी आपल्याभोंवतीं मान आणि प्रतिष्ठा यांचा जणूं कांहीं एक तटच उभा केला आहे. कोणताहि

लोकापवाद हा तट ओलांडून माझ्यापर्यंत येऊन पोंचूं शकला नाहीं. परंतु माझ्या आतेच्या आठवणीनें मात्र दुधांत मिठाचा खडा पडावा तशी माझ्या मनाची स्थिति होते! ती आठवण मला चैन पडूं देईल काय? आतांच तिच्या मृत्यूची बातमी ऐकली. ती कशानें मेली हें मला माहीत नाहीं. झुरून झुरून मेली असेल हें मात्र निश्चित! हें तर तिच्या मृत्यूपूर्वीं कैक वर्षें मी ओळखून होतों. मरतांना तिनें या आपल्या भाच्याची आठवण काढली असेल काय? आठवण काढली असेल, या कल्पनेनेंच अंगावर कांटा उभा राहतो!

आमचें मूळ गांव पश्चिमेकडचें. माझे वडील प्रतिष्ठित गृहस्थ असून आई अत्यंत कुशल गृहिणी होती. जितकी कुशल होती तितकी कोमल मनाची असती तर—? पण नको, या ‘तर’ च्या ‘आ’ वासलेल्या मुखांत शिरण्यांत अर्थ नाहीं! एकदां शिरलों कीं गेलोंच! मग ती सबंध गोष्ट त्या मुखांत पार कोठेंच्या कोठें गडप व्हावयाची आणि पुन्हां बाहेर निघण्याची आशा नको! एवढें खरें कीं आई जितकी कुशल होती तितकी कोमल अंतःकरणाची नव्हती. माझी आत्या वडिलांपेक्षां बरीच लहान होती. माझ्याहून कांहींतरी चार-पांच वर्षांनीं मोठी असेल. माझ्याप्रमाणें तीहि आईच्या छत्रा-खालीं राहत असे. आईची वागणूक कडक असे. त्या कडक वागणुकीपासून फायदा झाला कीं तोटा झाला याबद्दल अजून मी कधींकधीं विचार करीत असतों.

माझ्या वडिलांना एक भाऊ होता आणि तीन बहिणी. भावाला ओव्हरसियरची नोकरी होती. प्रथम त्यांनीं संयुक्त-प्रांतांत निरनिराळ्या जिल्ह्यांत काम केलें. पुढें एकाएकी त्यांच्या इच्छेनुसार त्यांना ब्रह्मदेशांत पाठविण्यांत आलें. तेव्हांपासून ते तेथेंच कायमचे स्थायिक झाले व हळुहळू इकडे येणेंजाणेंहि क्वचित् होऊं लागलें. इकडचा संबंध जवळजवळ तुटल्या-सारखाच झाला होता. दोघी बहिणी लग्नानंतर बाळंतपणांतच वारल्या. धाकटी बहीण—माझी आत्या—एवढीच एक राहिली होती. बाबांचें तिच्यावर अतिशय प्रेम होतें. तिचे सर्व लाड ते पुरवीत असत. बाबांच्या लाडांनीं ती बिघडूं नये म्हणून आई विशेष काळजी घेत असे. तिची देखरेख अत्यंत जागरूक असे. माझ्या आत्यावर तिचें प्रेम नव्हतें असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. आर्य गृहिणीचा तिच्या मनांत जो आदर्श होता त्या आदर्शाच्या मुशींतून आत्याबाईला ओतून काढण्याची तिची मनीषा होती.

आत्याबाईचें त्यावेळचें रूप आठवलें कीं मन दंग होतें! असें रूप विधाता क्वचितच कोणाला देत असेल! आणि जर दिलें तर त्याची किंमतहि पुरेपूर वसूल करून घेतल्याशिवाय तो सोडीत नाहीं. तिचा तो बांधा पाहून बाबांना तर अत्यंत आल्हाद होत असे. असो. माझी आणि आत्याबाईची फार गट्टी असे. ती घोड्याच्या गाडींत बसून आमच्या गांवांतील हायस्कुलांत शिकावयास जात असे आणि रोज घरीं आल्यावर

शाळेंतल्या गमती मला सांगत असे. " आज आमच्या बाईंना असं बनवलंय् प्रमोद, काय सांगूं तुला ! " असें म्हणून अशी खदखदा हंसत सुटायची कीं मी बघतच राहीं ! त्या वेळीं मी वाचलेल्या गोष्टींतील परीची मला आठवण होत असे आणि मी मुग्ध भावानें आपल्या आत्याबाईकडे आकृष्ट होऊन रहात असे.

ती म्हणे–" आणि हे बघ प्रमोद, ते गणिताचे मास्तर आहेत ना, त्यांच्या खुर्चीवर शीलानें टांचणी टोंचून ठेविली. शीला भारीच फाजील आहे ! मास्तरांचा एक डोळा तूं पाहिला आहेस प्रमोद ? मास्तर इकडे पहात असले कीं त्यांचा तो डोळा दुसरीकडे पहात असतो ! टांचणी बोंचल्याबरोबर ते असे चिडले कीं विचारूं नको ! रागावून म्हणाले, ' कोणाचा फाजिलपणा हा ? जिचा असेल तिनें उभें रहावें !' सगळ्या मुली अगदीं चूप बसल्या. शीला तर अशी बसली कीं जसा बोक्यासमोर उंदीर ! मास्तर छडी टेबलावर आपटून ओरडले –' मी एकेकीला झोडपून काढीन – लक्षांत ठेवा !' काय रागावले होते ते ! त्यांचा राग पाहून आम्ही आपल्या नुसत्या एकमेकींकडे पहात बसलों. मला बरं वाटलं नाहीं. मी चटकन् उभी राहून म्हटलें – ' माझी चूक झाली सर !' मास्तर आधीं माझ्याकडे पहातच राहिले. नंतर म्हणाले–' पुढें ये. ' मी गेलें. ' हात पुढें कर ! ' मी हात पुढें केला. त्यांनीं हातावर सपासप चार छड्या ओढल्या. मला वाटलं होतं आणखी

मारतील. पण त्यांनीं हातांतील छडी बाजूला ठेवून दिल्यावर मी हात काढून घेतला. खरं सांगू प्रमोद, मला मुळींच लागलं नाहीं ! मी आपली सारखी त्यांच्या त्या डोळ्याकडेच पहात होतें. मास्तर माझ्याकडे पहात होते, पण तो डोळा भलतीच-कडे पहात होता ! खरंच प्रमोद, तूं आमचे मास्तर पाहिले नसशील तर पहा एकदां ! मग ते ओरडले—' पुन्हां करणार नाहींस ना ? ' मी मुकाट्यानें उभी राहिलें आणि मनांत म्हटलं एक वेळ खरोखरच असा चावटपणा करून पाहीन ! मास्तर ओरडून म्हणाले—' जा बैस जागेवर. ' मी आपल्या जागेवर जाऊन बसलें. शीला माझ्या शेजारींच बसते. ती माझ्याकडे अशी बघूं लागली कीं वाटलं खाते कीं काय मला ! मी म्हटलं ' चल वेडी कुठची ! ' तिनें तेथें मेजावरच ठेवलेला माझा हात आपल्या हातानें दाबला. मी म्हटलं, ' शीला, हें काय हें ? बघ मास्तर त्याच डोळ्यानें तुझ्याकडे पाहतायत्. प्रमोद, तूं शीलाला ओळखतोस ? शीला फार चांगली आहे रे ! पण फाजिलहि तितकीच आहे. आम्हीं दोघी म्हणजे अगदीं बहिणीबहिणी झालों आहोंत. अन् वेडी अशी कीं शाळेंतून घरीं येतांना आपली माझ्या गळ्यांत गळा घालून रडूं लागली ! मी तिच्या गालावर हळूच चापटी मारली अन् म्हटलं, ' असं काय बरं शीला ? ' ती बोलेना अन् हुंदके देत देत रडूं लागली. प्रमोद, तुला एकदां शीलाच्या घरीं घेऊन जाईन हं ! येशील ? "

सांगतां सांगतां थोड्या वेळांत तिला एकाएकी कसली

आठवण व्हावयाची कुणास ठाऊक आणि एकदम म्हणायची, “ चल रे बाबा, तुझी आई रागावेल ! ” माझ्या आईला आत्याबाई फार भ्यायची आणि माझ्याशीं बोलतांना नेहमीं ‘ तुझी आई ’ असा तिचा उल्लेख करीत असे.

आत्याबाईचें शिकण्याकडे विशेष लक्ष नव्हतें. परंतु ती आपलीं पुस्तकें, वह्या वगैरे फार छान ठेवीत असे आणि शाळेंत जाण्याची तिला मोठी हौस होती. स्वभाव अत्यंत मोकळा आणि सदा हंसतमुख. फक्त आईसमोर तिला जरा संकोच वाटत असे.

लहानपणच्या कितीक गोष्टी आठवतात ! ती मला कपडे घालायची, कधीं एखाददुसरी चापटी मारून जेवूं घालायची, किती कुरवाळायची आणि आपलीं सगळीं रहस्यें मला सांगायची—सगळ्या सगळ्या गोष्टी आठवतात !

हळुहळू आम्हीं मोठे झालों. आत्याबाई आतां शहाणी व समजूतदार झाली होती. ती जवळ असली म्हणजे मला एक प्रकारचा धीर वाटे आणि तिच्या सोबतीकरितां मी भुकेलेला असे. ती जवळ असली म्हणजे मला मोठ्या ममतेनें उपदेश करी. “ हें पहा बाळ, मोठ्याचं नेहमीं ऐकत जावं, सर्वांशीं आदरानं वागावं, नेहमीं खरं बोलावं. शहाणीं मुलं पुढें मोठीं माणसं होतात. तूं मोठा माणूस होणार ना ? ” ती मला कधीं ‘ बाळ ’ म्हणे, कधीं ‘ भाऊ ’ म्हणे, कधीं दुसरें कांहीं नाहीं, नुसतें ‘ गाढव ’ म्हणे !

त्यावेळीं ती इंग्रजी सहावीच्या किंवा सातवीच्या वर्गांत

होती—मला नीट आठवत नाहीं. मी बारा वर्षांचा होतों. माझें मन त्यावेळीं सर्वस्वीं आत्याबाईच्या आधीन असे. ती माझ्यावर फार प्रेम करीत असे. परंतु त्या सुमारास तिच्या वागण्यांत बदल झाला असल्याचें मला आढळून आलें. ती आतां मला उपदेश करीत नसे. मला छातीशीं घट्ट धरून कुठें तरी शून्य दृष्टि लावून बसे. ती माझ्याशीं आतांशीं फार बोलतहि नसे. मी विचारीं, " आत्याबाई, आज शाळेंत काय गंमत झाली सांग ना? " ती म्हणे, " कांहीं नाहींरे — " पण माझ्याकडे तिच्यानें बघवत मात्र नसे. मग मी तिचे हात आपल्या हातांत धरून तिच्या दृष्टीशीं दृष्टि भिडवून म्हणें, " हें काय ग आत्याबाई, तूं हल्लीं आम्हांला कांहीं सांगत नाहींस हं ! " त्याबरोबर माझे दोन्हीं हात आपल्या डाव्या हातांत धरून उजव्या हातानें मला हळूच चापटी मारून ती म्हणे — " वेडा रे वेडा आमचा प्रमोद ! "

याच सुमारास आणखी एक गोष्ट माझ्या ध्यानांत आली. अलीकडे आत्याबाईला एकांत आवडूं लागला होता. संध्याकाळच्या वेळीं गच्चीवर एखादी खाट टाकून पडल्यापडल्या ती आकाशांत घिरट्या घालणाऱ्या घारींकडे दृष्टि लावून बसे. कधीं कधीं आकाशांत उडणाऱ्या पतंगांचे पेंच पहात बसे आणि एखादा तुटलेला पतंग वाऱ्याबरोबर वाहवूं लागला कीं तो दृष्टिआड होईपर्यंत त्याच्याकडे डोळे लावून बसे. नाहींतर खाटेवर उपडी पडून कोळशाच्या तुकड्यानें जमिनीवर कांहींतरी रेघोट्या काढीत बसे.

अशा वेळीं मी गच्चीवर येऊन पोंचलों तर तिला त्या स्थितींत पाहून तसाच उभा राहीं. मी आल्याचें लक्षांत आल्याबरोबर ती चमकून उठे आणि म्हणे, " अरे प्रमोद, कुठें होतास रे तूं ? "

" इथंच होतों कीं–"

" काय रे, तूं हल्लीं माझ्याशीं बोलतहि नाहींस ? "

मी कांहीं न बोलतां खाटेवर तिच्याजवळ येऊन बसे. ती हळूहळू मला आपल्या अंगावर ओढून घेई. आणि म्हणे, " तो पतंग पाहिलास कां ? "

थोड्या वेळानें पुन्हां म्हणे, " तुला पतंग उडविणं आवडतं कां रे ? "

मी म्हणे " हो ! "

" तुला पतंग उडवायचा आहे ? "

" बाबा नको म्हणतात. "

आणि मग एकाएकीं मला मांडीवर घेऊन ती उत्साहानें म्हणे, " आपण दोघं बरोबर पतंग उडवूं हं ! खूपखूप उंच उडवूं– अगदीं सर्वांपेक्षां उंच ! उडवायचा ना ? "

मी म्हणे " पैसे दे – मी आणतों. "

कांहीं वेळ ती माझ्याकडे पहात राही. तिची दृष्टि अगम्य असे. जणूं कांहीं मी समोर दिसतच नाहीं अशा दृष्टीनें माझ्या आरपार ती कुठं पहात असे कुणास ठाऊक ! मग एकाएकीं भानावर येऊन किंचित् लाजून म्हणे, " नकोरे बाबा, पतंग उडवितांना मुलं गच्चीवरून पडतात एखादवेळीं ! "

त्याच दिवसांतली हकीकत. एक दिवस ती शाळेंतून फार उशीरां परत आली. आईनें विचारलें, " कुठं होतीस ग इतका वेळ ? "

" शीलाकडे गेलें होतें. "

हें ऐकून आई गप्प बसली.

त्या दिवशीं आत्याबाई नेहमींपेक्षां जास्त अस्थिर दिसत होती. ती विशेष आनंदांत असून कोणत्याहि कामांत तिचें लक्ष लागत नव्हतें. त्या दिवशीं तिनें माझ्याशीं बोलतांना कितीक बेत केले आणि कितीक तऱ्हतऱ्हेच्या गोष्टी केल्या. ' प्रमोद, एक दिवस त्या कालव्याच्या पुलावर जाऊं रे ! येशील ? ', ' तुला काय आवडतं सांग, - घीवर आवडतो ? अरे, घीवर कसलं खाणं रे, शीः ! ', ' अरे तूं पतंग नाहीं आणलास कां ? ' ' प्रमोद, मी शीलाकडे बराच वेळ थांबलें होतें. तुझ्या आईला काय वाटलं असेल रे ? ' ' चल रे प्रमोद, इथं काय खोलींत बसून रहायचं ? चल गच्चीवर मोकळ्या हवेंत बसूं '--एक कांहींतरी बोलायची आणि लगेच विसरून जायची ! त्यावेळीं तिच्या मनांत कोणतीहि गोष्ट टिकून राहात नव्हती—विचार नाहीं अन् अविचारहि नाहीं ! जणूं कांहीं आंत हवा भरलेल्या एखाद्या फुग्यासारखें तें हवेंत तरंगत होतें ! ती उगाच हंसे आणि उगाचच मला पकडून इकडून तिकडे ओढी. तिला काय झालें आहे हेंच मला समजेना. मी म्हटलं, " आत्याबाई —आज झालयं काय तुला ? "

ती म्हणाली, " आत्याबाई कसलं रे ? मला आत्याबाई म्हटलेलं आवडत नाहीं. प्रमोद, तूं मला ताई म्हणत जा. शीला मला ताईच म्हणते. "

" पण माझी तर आत्याबाई आहेस ना ? "

"मला नाहीं आत्याबाई व्हावसं वाटत ! आत्याबाई ! शीः ! बघ बघ, ती चिमणी किती उंच उडत्ये ! मला चिमणी व्हावंसं वाटतं ! "

मी आश्चर्यानें विचारलें, " चिमणी ? "

" हो चिमणी ! तिचे पंख किती छोटेसे असतात ! पंख पसरून ती आकाशांत वाटेल तिकडे भराऱ्या मारते ! आहे कीं नाहीं मौज ? लहानशी चिमणी, लहानसं शेपूट ! मला चिमणी व्हावसं वाटतं ! "

त्या दिवशीं रात्रीं किती वेळपर्यंत तरी ती मला घट्ट पोटाशीं धरून निजली होती. तशा स्थितींत तिनें विचारलें, " प्रमोद, मी तुला आवडते कां रे ? " तें ऐकून कांहीं न बोलतां मी तिच्या कुशींत डोकें खुपसून तिला जास्त बिलगलों. त्यावर ती म्हणाली, " प्रमोद, तूं मला फार आवडतोस रे ! "

त्या दिवसानंतर पुष्कळ दिवस तिला शाळेंतून यायला उशीर होत असे. एक दिवस इतका उशीर झाला कीं तिच्या शोधार्थ नोकराला पाठवावें लागलें आणि तो तिला शीलाच्या घरून बोलावून घेऊन आला.

पुढें तीन दिवसांनंतरची गोष्ट. मी नुकताच बाहेरून आलों

होतों. पहिलें तों आई तणतणत कोठें तरी चालली होती. मला पाहिल्याबरोबर ती थांबली आणि उगाच आपली माझ्या अंगावर ओरडली. " काय रे , कुठं होतास इतका वेळ ? " आईची मुद्रा पाहून मला उत्तर द्यायचा धीर होईना.

" जा, एक छडी आण पाहूं ! "

मी बघतच राहिलों. आई रागावून म्हणाली---

" ऐकूं येत नाहीं कां ? जाऊन एक छडी घेऊन ये ! "

काय प्रकार आहे याची मला मुळींच कल्पना नव्हती. भीति अशी वाटली कीं मलाच मार बसतो कीं काय ! भीत-भीत जाऊन बाबांच्या खोलींतून काठी घेऊन आलों. ती घेऊन कांही एक न बोलतां ती मागच्या बाजूच्या खोलींत शिरली. आंत जाऊन तिनें दार बंद केलें आणि थोड्याच वेळांत कोणाला तरी सपासप फटके मारल्याचा आवाज माझ्या कानीं आला. मी जागच्याजागीं तटस्थ होऊन उभा राहिलों ! पहिल्या फटक्यासरशी एक अस्फुट किंकाळी माझ्या कानीं आली, पण पुढें मात्र कांहीं एक आवाज ऐकूं आला नाहीं. फटक्यांचा सपासप आवाज मात्र ऐकूं येत होता. मला शंका आली कीं आत्याबाई तर नसावी ? शंका मनांतून जाईना आणि दृढहि होईना. मी विवश होऊन तेथेंच उभा राहिलों. मन सुन्न झालें आणि जों जों वेळ जाऊं लागला तों तों माझी अधीरता असह्य होऊं लागली.

थोड्या वेळानें आई दार उघडून बाहेर आली. तिचे ओठ

निळे पडले होते आणि ज्या हातांत काठी होती तो हात कांपत होता. तिचा चेहरा राखेसारखा फिक्का पडला होता. असें वाटलें कीं जणूं कांहीं ही आतां स्वतःलाच फटके मारून घेते कीं काय? आणि स्वतःलाच न मारल्यामुळें जणूं कांहीं तिच्या मनाला अत्यंत कष्ट होत असावेत! ती माझ्या समोरूनच आपल्या खोलींत निघून गेली. जातांजातां दाराशीं थांबली आणि आपल्या हातांतली काठी ताडकन् खोलींत फेंकून चालती झाली. काठी माझ्या पायाशीं येऊन पडली.

काय प्रकार आहे माझ्या ध्यानांतच येईना! मी चुळबुळ करीत उभा होतों. थोड्या वेळानें जिवाचा धडा करून त्या खोलींत गेलों. पहातों तों काय! आत्याबाई उपडी पडली होती, आणि अस्ताव्यस्त झालेलें तिचें लुगडें मार बसल्यामुळें कांहीं ठिकाणीं फाटण्याच्या बेतांत आलें होतें. अंगावर जागोजाग निळे काळे वण उठले होते व कांहीं ठिकाणीं रक्तहि आलें होतें. ती सुन्न होऊन पडली होती—रडत नव्हती कीं हुंदकेहि देत नव्हती. तिचे केंस अस्ताव्यस्त झाले होते आणि दोन्हीं हातांवर डोकें टेकून ती मुकाट्यानें जमीनीवर पडली होती. तिथें उभें राहणें मला अशक्य झालें. धड कांहीं बोलवेना. आत्याबाईच्या गळ्यांत गळा घालून थोडेंसें रडून घेता आलें असतें तरी बरें झालें असतें. पण तें माझ्यानें झालें नाहीं. पाऊल न वाजवितां मी हळूच परत आलों.

त्यादिवसानंतर मी आत्याबाईच्या तोंडावर हास्य कधीं

पाहिलें नाहीं. पांचसहा महिन्यानंतर आत्याबाईचें लग्न झालें. आईनें घाईघाईनें सगळी व्यवस्था केली. लग्न ठरलें त्या दिवसापासून आत्याबाईचें शिक्षण संपलें. तेव्हांपासून ती शिवण टिपण करण्यांत, झाडलोट करण्यांत व इतर अशाच कामांत व्यग्र झाली. या कामाव्यतिरिक्त आतां तिचें मन दुसरीकडे कुठेंच लागेना. ती कोणाच्या दृष्टीस पडूं इच्छित नव्हती. धोब्याकडून धुवून आलेले कपडे जर घालायला मिळाले तर ती चटकन् ते मळवून टाकी. माझ्याकडून ती दूरदूर राहण्याचा प्रयत्न करी. बाबांच्याहि तोंडावर एक प्रकारची खिन्नतेची छाया पसरली आहे असें मला आढळून आलें. ते कधीं कधीं आत्याबाईशीं विनोद करूं पहात, परंतु तिच्या चेहऱ्यावर त्याचा कांहीं एक परिणाम होत नाहीं असें पाहिलें कीं त्यांचा चेहरा उतरे. आईची गोष्ट तर विचारूंच नका ! विनाकारण उठल्यासुटल्या मला रागें भरायची आणि तुसडायची. नोकरांना तर भारीच बोलणीं खावीं लागत. मधून मधून उगाच आपल्याशींच काय बडबडायची कुणास ठाऊक ! अशा वेळीं चुकून मी समोर दिसलों कीं माझ्यावर तुटून पडायची—

" एवढाले डोळे करून पहात काय राह्यला आहेस रे ? आत्याबाई जवळून केरसुणी घेऊन झाडलंस तर कांहीं पाप लागेल का ? आजकालची पोरं कामचुकारच भारी ! "

नाहींतर म्हणायची—

" अरे हा बन्सी गेलाय् कुठं ? कुठ्ठ नाहीं दिसत ना ? सगळं काम बिचाऱ्या पोरीला करावं लागतं ! थांबा, दंड करते एक रुपया, त्या शिवाय हे मेले नोकर ताळ्यावर यायचे नाहींत !"

रोजरोज या गोष्टी ऐकूं येत असत. पण कां कुणास ठाऊक, आत्याबाईशीं प्रत्यक्षपणें आई कांहीं बोलत नसे.

हळुहळू लग्नाचा दिवस जवळ येत चालला आणि लग्न पार पडलें. सासरीं जाण्यापूर्वीं बराच वेळ आत्याबाई मला घट्ट छातीशीं धरून रडत होती. मला म्हणाली, " प्रमोद, बाळ, मोठ्यांचें नेहमीं ऐकत जावें, सर्वांशीं आदरानें वागत जावें, नेहमीं खरें बोलावें बरं ! शहाणीं मुलं अशीं वागतात हो ! प्रमोद, तूं पुढं मोठा मनुष्य होणार ना ?"

तसें पाहिलें तर मी आतां मोठा झालों होतों, अगदींच कांहीं लहान नव्हतों. तरी त्यावेळीं आत्याबाईच्या मांडीवर मुकाट्यानें एखाद्या पिल्लासारखा पडलों होतों.

आत्याबाई म्हणाली - " प्रमोद, तुझी आत्याबाई तर आतां मेली ! तिची आठवण सुद्धां काढूं नको हं ! शहाणा आहे माझा राजा— "

माझे डोळे ओले झाले. अर्थात् आत्याबाईच्या तें लक्षांत येऊं दिलें नाहीं आणि तिथेंच तोंड खुपसून पडून राहिलों.

आत्याबाई जायला निघाली त्यावेळीं मात्र मी सर्वांसमोर मनसोक्त रडलों. कोणाची पर्वा केली नाहीं कीं लाज बाळगली

नाहीं . मी झटकन् आत्याबाईच्या पदराला चिकटलों आणि पदर घट्ट धरून ठेवला, आणि म्हटलें, "मी आत्याबाई-शिवाय खाणार नाहीं, पिणार नाहीं—कांहीं नाहीं!" आईला म्हटलें, "तूं राक्षसीण आहेस. मी आतां या घरांत पाऊल नाहीं ठेवणार!" त्याबरोबर बाबांनीं मला तिथल्यातिथें दोनतीन चपराका ठेवून दिल्या. पण मी हललों नाहीं. पदर हातांतून सुटला तसा लागलीच मी आत्याबाईच्या पायांना चिकटलों. त्याबरोबर आत्याबाईनें खालीं वांकून मला पायावरून उचललें. तिचे डोळेहि रडून रडून सुजले होते. माझी हनुवटी उचलून माझ्याकडे पहात ती म्हणाली, "प्रमोद, तूं माझं ऐकणार ना? मला जाऊं दे तर, मी लवकर परत येईन बरं!"

अश्रूंनीं भिजलेला तिचा चेहरा पाहिल्याबरोबर माझा हट्ट पार नाहींसा झाला. मी म्हटलें, "खरंच लवकर येशील?"

"खरंच येईन"

"माझी शपथ?"

"माझ्या प्रमोदची शपथ!"

जवळच आई उभी होती. तिचेंहि तोंड सुकल्यासारखें झालें होतें. तिला पाहतांच असें वाटलें कीं हिच्या गळ्यांत पडून "आई! आई!" म्हणून रडावें! इतक्यांत आत्या-बाईनें माझ्या हातांत एक रेशमी रुमाल ठेवला आणि ती झटकन् तेथून निघून गेली. दारासमोरून मोटार केव्हां निघून गेली हें सुद्धां मला कळलें नाहीं!

---

# २

आत्याबाई गेल्यावर माझें चित्त कशांतच रमेना. आईनें माझी समजूत घालण्याचा प्रयत्न केला. कधीं कधीं असें होई कीं मलाच तिची समजूत घालावी लागे. लग्नाच्या धामधुमी-नंतर सगळें घर कसें सुनेंसुनें वाटूं लागलें होतें.

चवथ्या दिवशीं आत्याबाई परत आली. तिच्या पतींना मी लग्नांत पाहिलेंच होतें. वयानें बरेच मोठे दिसले. आणि त्यांच्या मिशा केवढाल्या होत्या ! त्यांचा झोंकनोक पाहण्यासारखा होता. हा त्यांचा दुसरा विवाह आहे हें मला नंतर कळलें. अन् आमची आत्याबाई तर फुलासारखी नाजूक ! ती जेव्हां सासरहून घरीं आली तेव्हां माझ्याकरितां तऱ्हतऱ्हेच्या वस्तु घेऊन आली होती. तिनें मला बाजूला नेऊन म्हटलें—" प्रमोद, पाहिलंस मी तुझ्या-करितां काय काय आणलंय् ? "

मला त्या वस्तु पाहण्याची उत्सुकता नव्हती. आत्याबाईनें माझ्याशीं गप्पागोष्टी कराव्या ही माझी इच्छा होती. पूर्वीं

ज्याप्रमाणें सुखदुःखाच्या गोष्टी सांगत असे त्याचप्रमाणें तिनें आपल्या सासरच्या गोष्टी मला सांगाव्या यासाठीं मी उत्सुक होतों. तिच्या चेहऱ्यावरचा तजेला उतरल्यासारखा कां दिसत असावा ? तिच्या वागणूकींत एक प्रकारची खिन्नतेची छाया कां बरं दिसावी ? आत्याबाई, मी पूर्वींचाच तुझा प्रमोद आहे ग ! पाहिलंस कां– मी आतां लहान मूल राहिलों नाहीं हं ! तुझ्या जीवाला काय कष्ट होत आहेत ते मला सांग बरं–बघ मला समजतात कीं नाहीं ! मी आतां लहान नाहीं, आत्याबाई ! तुला कोण त्रास देतं मला सांग–मी त्याचा समाचार घेतों ! मला तूं आणलेल्या वस्तु नाहीं पाह्यच्या ! आत्याबाई, तुझ्या मनांतलं दुःख तूं तुझ्या प्रमोदला नाहीं सांगणार ?

बोलल्याशिवाय हें सर्व तिला सांगण्याची माझी इच्छा होती. मी बोलत नाहींसें पाहून तिनें विचारलें–" काय रे, मी काय काय आणलंय् तुला पाह्यचं नाहीं कां ? गप्प कां बसलास ?"

मी तिच्याकडे पहात शांतपणें म्हटलें–" दाखव ना ! "

ती गोंधळल्यासारखी झाली आणि म्हणाली–" असं काय बोलतोयस् रे ? झालंय् काय तुला ? "

" कांहीं नाहीं. "

" मग हें काय ? "

मी म्हटलें—" तूं माझ्याशीं पूर्वींप्रमाणें वागत नाहींस–"

आत्याबाईला हे शब्द लागले असावेत ! ती म्हणाली—

“ कांहींतरी बोलतोस झालं! पूर्वींसारखी नाहीं वागत तर आणखी कशी वागतें रे?”

“ परकेपणानें वागूं लागली आहेस” मी उत्तर दिलें.

हें ऐकल्याबरोबर ती स्तब्ध होऊन मजकडे पाहूं लागली. आपल्या मांडीवर मला ओढून घेऊन ती म्हणाली, “ प्रमोद, खरं सांगायचं म्हणजे मी परकीच झाली आहे. तुम्हां सर्वांना मी आतां परकी आहे. तुझ्या आईनें मला धक्के देऊन परकी केली आहे. पण मला जिथं पाठविलं आहे तिथें माझें मन रमत नाहीं. प्रमोद, एक काम करशील?

मोठ्या उत्सुकतेनें मी तिच्या तोंडाकडे पाहिलें. असें वाटलें तिला सांगावें कीं तुझें काम मी करणार नाहीं तर तुझा प्रमोद म्हणून जन्म घेतला कशाला?”

“ करशील का?” तिनें पुन्हां विचारलें.

दुसऱ्यांदा हा प्रश्न ऐकल्याबरोबर तिच्या मांडीवरून मी उठून बसलों आणि म्हणालों—“ काय सांग ना—आतांच्या आतां करतों!”

कांहीं वेळ ती माझ्याकडे टक लावून पाहत राहिली. नंतर एकाएकी लाजल्यासारखी होऊन म्हणाली—“ कांहीं नाहीं—कांहीं नाहीं.”

मी लगेच तिचा हात धरून म्हटलें—“ नाहीं नाहीं—सांग! अगदीं खरं सांग—बघ मी करतों कीं नाहीं.”

“ शीलाकडे जाशील?”

" हो, जाईन कीं—"

" जाऊन काय करशील ?"

मला कांहींच समजेना. मी तिच्याकडे पहात राहिलों. ती म्हणाली--" नाहीं रे, मी उगाच चेष्टेनें म्हटलं. खरंच कांहीं काम नाहीं."

असें म्हणून मोठ्या आग्रहानें आपण आणलेल्या वस्तु मला दाखवूं लागली. त्यांत एक छोटीशी बंदुक होती ती मला फार आवडली. आत्याबाईनें विचारलें—" तुला बंदुक आवडते का रे ?"

" मी बंदुक घेऊन कावळ्यांना गोळ्या घालून मारीन. मला कावळे अगदीं आवडत नाहींत !"

" खऱ्या बंदुकीनें माणसें सुद्धां मरतात बाबा ! म्हणून तर ही खेळांतली बंदुक आणली आहे. काय रे--मरण म्हणजे काय तें तुला कळतं का ?"

" हो—"

" काय सांग पाहूं—"

" मेल्यावर मनुष्य ऽ अं ऽ मरतो, दुसरं काय ?"

आत्याबाई हंसू लागली. नंतर थांबली आणि म्हणाली—

" मी मेलें तर तूं काय करशील रे ?"

मी कांहींच बोललों नाहीं, नुसता तिच्याकडे टक लावून पहात राहिलों. मनांत आलें कीं सांगावं मी कांहीं लहान मूल नाहीं, मला सगळं कळतं; मरणाबद्दल इतक्या थट्टेनें बोलणें चांगलें नाहीं; ती मरूं शकते तर मीहि नाहीं का मरूं शकत ?

तिला कदाचित् कल्पना नसेल कीं ती मेली तर मी क्षणभर सुद्धां प्राण ठेवणार नाहीं--खरोखरच नाहीं ठेवणार! परंतु मी जिवंत आहे तोंपर्यंत तिला कोण मारूं शकतो तें मी पहाणार आहे!

दुसऱ्या दिवशीं एक चिठ्ठी देऊन तिनें मला शीलाच्या घरीं पाठविलें. मी शीलाला ओळखीत होतों, पण तिला कोणी मोठा भाऊ आहे हें मला माहीत नव्हतें. त्यांच्याच हातांत चिठ्ठी द्यायला मला तिनें सांगितलें होतें. शीलाचा वडील भाऊ मला फार छान वाटला. मी चिठ्ठी त्यांच्याजवळ दिल्याबरोबर ते ती वाचण्यांत इतके दंग झाले कीं समोर मी उभा आहे हेंहि त्यांना भान राहिलें नाहीं. मला थोडेसें चमत्कारिक वाटलें. परंतु नंतर मात्र त्यांनीं माझें भारीच कौतुक केलें--जवळ काय घेतलें, मुके काय घेतले, खांद्यावर बसविलें आणि तऱ्हतऱ्हेचे पदार्थ खायला दिले! शीलासुद्धां मला फार आवडली. मी मनांत म्हटलें, कोणत्या ना कोणत्या निमित्तानें रोज येथें यायला मिळेल तर काय बहार होईल? शीलाच्या भावानेंसुद्धां एक चिठ्ठी लिहून माझ्या खिशांत ठेविली, आणि म्हटलें--" काय नांव रे तुझं?--प्रमोद काय? मोठा हुषार दिसतोस रे तूं!" असें म्हणून पुन्हां एकदां मला उचलून घेऊन माझा मुका घेतला, आणि म्हटलें--" ही चिठ्ठी आपल्या आत्याबाईच्याच हातांत दे! देशील ना?"

त्यांनीं चिठ्ठी आईला द्यायला सांगितली असती तरी मी आधीं आत्याबाईजवळच दिली असती. मी कांहींच बोललों नाहीं.

शीलाच्या भावानें चॉकोलेटचीं दोनचार पाकिटें माझ्या खिशांत कोंबलीं, आणि म्हटलें—" तूं मोठा चांगला मुलगा आहेस. काय शिकतोस ? "

" इंग्रजी चवथींत."

" अरे वा—शाबास ! बरं प्रमोद, आपल्या आत्याबाईला सांग, म्हणावं मी अजून महिनाभर इथंच आहे. समजलं ? "

मनांत म्हटलं, " न समजायला काय झालं ? "

" काय समजलं ? " त्यांनीं पुन्हां विचारलें.

" —— मी एक महिनाभर इथंच आहे. "

शीलाचे भाऊ हें ऐकून मोठ्यानें हंसले. " तूं नाहीं बाबा-मी, मी ! "

जी चिठ्ठी माझ्याजवळ दिली होती ती पाकीटांत बंद केलेली नव्हती. आत्याबाईनेंहि अशी घडी घालून चिठ्ठी दिली होती. पण शीलाचे भाऊ मला इतके आवडले कीं त्यांचें अक्षर किती सुरेख आहे तें मला पहावेंसें वाटत होतें. मी चिठ्ठी उघडून पाहिली. अक्षर किती सुंदर होतें ! मनांत म्हटलें मला असें सुंदर इंग्रजी अक्षर कधीं लिहितां येईल का ? पत्राच्या मायन्यांतील My dear हीं अक्षरें तर इतकीं सुंदर लिहिलीं होतीं, कीं तशींच अक्षरें माझ्या पत्रांत लिहिण्याचा प्रयत्न मी पुढें कित्येक दिवस करीत होतों ! घरीं आल्यावर पत्र सरळ आत्याबाईच्या हातांत दिलें आणि तीहि चटकन् तें उघडून वाचूं लागली. पत्र लहानसेंच होतें. पण ती किती वेळ तरी

वाचीत होती ! प्रमोद आपला कोणी आहे आणि तो जवळच उभा आहे हेंहि ती विसरली होती ! पुष्कळ वेळानें तिनें पत्रा-वरून दृष्टि काढली, पत्राची घडी केली आणि माझ्याकडे पाहिलें — अशा नजरेनें पाहिलें कीं जणूं कांहीं ती मला ओळखीतही नव्हती ! जणूं कांहीं काय झालें आहे, काय आहे, काय होणार आहे याचें तिला भानहि नव्हतें ! नंतर तशाच बेभान अवस्थेंत माझ्याकडे पहात पहात एखाद्या यंत्राप्रमाणें त्या चिठ्ठीचे फाडून लहान तुकडे केले—जणूं कांहीं ती स्वतः कांहीं करीत नसून कुणी तरी तिच्याकडून क्रिया करवून घेत आहे ! हळूहळू ती शुद्धीवर आली. जणूं आतां कुठें तिला आपल्या भोंवतालच्या जगाचें थोडेंथोडें भान झालें होतें ! कांहीं वेळानें ती म्हणाली, " प्रमोद, आतां तूं पुन्हां तिकडे कधीं जाऊं नको. तुला उत्तर घेऊन यायला कुणी सांगितलं होतं ? पुन्हां अशी कुणाचीं पत्रं कधीं आणूं नको, समजलं ? "

मला कांहींच समजलं नाहीं !

ती म्हणाली— " तुला एवढं कसं समजत नाहीं रे प्रमोद ? तुला माहीत नाहीं माझं लग्न झालंय् ? "

मी म्हटलें— " हो मला माहीत आहे— "

" तुला कांहीं अक्कल नाहीं ! गाढव आहेस तूं ! माझ्या हृदयांत आग भडकली आहे— "

मी काय बोलणार ?

" हृदयाची आग म्हणजे काय असतं तुला माहीत आहे रे ?"

हृदयाची आग ही काय चीज आहे हें मला खरोखरच माहीत नव्हतें. परंतु त्यावेळीं आत्याबाईकडे पाहून, विशेषतः चेहऱ्यावर क्षणभर उमटून क्षणांत नाहींसें होणारें तिचें स्मित पाहून, मला अत्यंत वाईट वाटलें. मनांत म्हटलें मी आतां कशा तऱ्हेनें हिच्या उपयोगीं पडूं आणि हिचें दुःख हलकें करूं ! कीं तिच्या गळ्यांत गळा घालून मनसोक्त रडून घेऊं ?

ती म्हणाली, "हें पहा प्रमोद, यापुढें जर शीलाच्या भावाकडून कांहीं चिठ्ठीचपाटी आली तर मी गच्चीवरून खालीं उडी टाकून जीव देईन ! मला ते समजतात तरी कोण ? म्हणे My dear !"

शीलाच्या भावानें सांगितलेला निरोप अद्यापि मी कोठें सांगितला होता ? तो सांगून आणखी वरती शीलाचे भाऊ मला फार आवडतात हेंहि मी सांगणार होतों ! इतक्यांत आत्याबाई म्हणाली, " त्यांना जाऊन हें सांग. मी खरंच सांगतें– मी जीव देईन अशानें ! मृणालचा शब्द खोटा व्हायचा नाहीं !"

हे शब्द तिनें अशा आविर्भावानें उच्चारले कीं जणूं कांहीं एकदां सांगून तिचें समाधान झालें नव्हतें, आणि असें कांहीं झालें तर आपल्याला जीवच द्यावा लागेल असें ती आपल्याच मनाला पुन्हां पुन्हां पटवून देत होती.

आतां तिला सासरीं परत जायला चारपांच दिवस उरले

होते. त्यानंतर तिचे पति येऊन तिला घेऊन जाणार होते. सासरीं जायला ती मुळींच उत्सुक दिसली नाहीं. जसजसा जाण्याचा दिवस जवळ येत चालला तशी तशी ती भ्रमिष्टा-सारखी करूं लागली. एका ठिकाणीं दृष्टि लावून बसली म्हणजे तिकडेच शून्य दृष्टिनें पहात बसे ! जणूं कांही समोर कांही दिसतच नाहीं, फक्त आपलें भाग्य—तेंहि अस्पष्टच—दिसतें आहे ! त्या प्रश्नात्मक अपेक्षापूर्ण दृष्टीनें जणूं कांहीं प्रश्न न विचारतांच ती उत्तराची अपेक्षा करीत होती— "मला कांहीं तरी पाहिजे ! काय तें कोणी सांगेल का ?"

दुसऱ्या दिवशीं तिचे पति येणार होते. आदल्या रात्री-पासून ती अस्वस्थ झाली होती. आपल्या खोलींत नुसत्या चटई-वर पडून राहिली होती. मला म्हणाली -- "प्रमोद, मी उद्यां जाणार --"

मी बोललों नाहीं. तिचें कपाळ चेपीत होतों तें चालूं ठेवलें.

ती म्हणाली--"आतां पुरें बरं बाळ –"

मी म्हटलें–" तूं कांहीं औषध घेत नाहींस -- "

ती माझ्याकडे पहात राहिली. थोडावेळ थांबून म्हणाली --

"प्रमोद, एक काम करशील ? शीलाचे भाऊ डॉक्टरीच्या कॉलेजांत शिकतात. मी एक औषधाचं नांव लिहून देतें तें त्यांच्याकडून आणशील ?"

मी नाहीं म्हणणार ? तिनें एका कागदावर कांहींतरी इंग्रजी नांव लिहून दिलें व तो कागद घेऊन मी पळतच शीलाकडे गेलों.

शीलाच्या भावानें ती चिठ्ठी पाहिली मात्र, आणि ते मला जणूं मारायलाच उठले! रागावून ते म्हणाले -- " हें काय आहे ? "

" आत्याबाईनें औषध मागविलं आहे -- "

" औषध ? "

" हो, औषध, -- तिचं जरा डोकं दुखतंय् -- "

शीलाचे भाऊ कांहीं बोलले नाहींत, नुसते खोलींत इकडून तिकडे जोरानें येरझारा घालूं लागले. कागदाचा चोळामोळा करून त्यांनीं आपल्या हातांत घट्ट दाबून धरला होता. त्यांच्या त्या हाताच्या फुगलेल्या शिरा पाहून मला कसेंसेंच वाटलें.

थोड्या वेळानें मी म्हणालों — " मी जाऊं ? "

हें ऐकून ते थांबले. माझ्याकडे अत्यंत प्रेमळपणानें पहात ते म्हणाले, " मी स्वतः येऊन तिची प्रकृति पाहून जाऊं का ? मला घेऊन चलतोस रे ? "

मी लागलीच उत्तर दिलें -- " छे–छे ! आत्याबाई गच्चीवरून खालीं उडी मारून जीव देईल ! "

यावर ते कांहींच बोललें नाहींत. मी विचारलें-- " औषध नाहीं कां देणार ? " ते रागावून ओरडले -- " औषध ? "

" देत नसाल तर मी जाऊं ?"

यावर आपल्या मुठींत चोळामोळा करून दाबून धरलेला तो कागद त्यांनीं बाहेर काढला आणि जोरजोरानें त्याचे तुकडे केले. त्या तुकड्यांचा पुन्हां चोळामोळा करून माझ्या अंगावर भिरकावला आणि म्हणाले–"हें घे औषध! जा घेऊन जा हें !" आणि मग आपल्याशींच पुटपुटले " विष खाऊन जीव देण्या-पर्यंत पाळी आली अं हिची ! "

यानंतर विशेष कांहीं घडलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं आत्या-बाईचे पति आले. मी त्यांच्याशीं मोकळेपणानें बोलूं शकलों नाहीं. त्यांनींहि माझी विचारपूस केली नाहीं. आत्याबाईची प्रकृति जरा जास्त बिघडली होती. विशेष कांहीं होत होतें अशांतला भाग नाहीं, परंतु एकंदरींत तिला बरें नव्हतें. तिचे पति म्हणाले, " मी प्रवासांत तिला त्रास होऊं नये अशी सर्व व्यवस्था केली आहे. सारा तीनशें मैलाचा काय तो प्रवास आहे ! मोटारनें जाऊं. वाटेंत ठिकाठिकाणीं डाकबंगले आहेतच. तिला कोणत्याहि प्रकारचा त्रास होणार नाहीं. आपण अगदीं निश्चिंत रहा. "

बाबा म्हणाले " बरं आहे. पण– "

" छे हो – तुम्हीं अगदीं काळजी करूं नका ! तिला मुळींच त्रास होणार नाहीं — "

" तिची प्रकृति जरा – " बाबा अडखळत म्हणाले.

“ छे – छे ! उलट इथली हवा थोडीशी – तिला हवापालट पाहिजे. सप्टेंबर महिना सुरूं झाला कीं काश्मीरला घेऊन जाईन म्हणतों. सप्टेंबर आक्टोबर हे काश्मीरचे आयडियल महिने असतात. गुलमर्गची हवा म्हणजे काय — ”

दुसऱ्या दिवशीं काळजीपूर्वक सर्व व्यवस्था करून मोठ्या प्रेमानें ते आत्याबाईला घेऊन गेले.

---

# ३

यानंतर कांहीं दिवसांनीं आम्हांला या बाजूला पूर्वेकडील प्रांतांत यावें लागलें. तेथें मी शाळेंत जाऊं लागलों आणि एक इयत्ता वर गेलों. आत्याबाई मला विसरली नव्हती. तिचीं पत्रें येत असत परंतु तीं संक्षिप्त असत. आईकडून मला एवढें कळत असे कीं आत्याबाईची प्रकृति वगैरे बरी असून बाकी विशेष कांहीं लिहिलेलें नाहीं. बाबांजवळ आत्याबाईबद्दल गोष्ट काढली म्हणजे ते अगदींच गप्प बसत. त्यांच्या जीवाला सुख नव्हतें. मला कांहींच समजत नव्हतें. मी म्हणे– " बाबा मला पाठवतां कां – मी जाऊन आत्याबाईला घेऊन येतों ! "

ते आनंदानें म्हणत–" खरं तूं जाशील ? " पण बघतां-बघतां त्यांचा आनंद मावळत असे आणि ते म्हणत –" कुठं जाणार बाबा तूं ? मृणाल आतां आपल्या घरीं गेली आहे. ती आपली राहिली नाहीं. राहील तिथंच मजेनें-- आपलं काय ? "

लग्नानंतर सुमारें आठदहा महिन्यानंतरची गोष्ट. एक दिवस बघतों तों काय, आधीं कांहीं एक कळविल्याशिवाय एका नोकराला बरोबर घेऊन आत्याबाई घरीं निघून आली! बाबांना हें आवडलें नाहीं. पण त्यांना मनांतून आनंदहि झाला असावा. आईनें बाहेर कांहींच दाखविलें नाहीं, पण पाठीमागें मात्र तिच्या नवऱ्याला भरपूर शिव्या देऊन घेतल्या.

आत्याबाई आली अन् माझे पूर्वीचे दिवस परत आले. परंतु तिच्यामध्यें मोठा बदल झाला असल्याचें मला आढळून आलें. ती नेहमीं अस्वस्थ दिसे. एका क्षणाला मोठ्या आनंदानें गप्पागोष्टी करील तर दुसऱ्याच क्षणाला काळोखांत कुठंतरी एकटीच जाऊन बसून राहील! तिची प्रकृतीहि बरी दिसली नाहीं. चेहरा फिक्कट पडला असून तिला दिवस गेले होते असें दिसलें. तिच्या जिवाला चैन नव्हतें. खाणेंपिणें कांहीं गोड लागेना, कशांतच तिचें मन रमेना. एकदां अशीच ती पडून राहिली असतां मी जवळ बसून विचारलें -- " आत्याबाई, आतां तूं इथंच राहणार ना? लवकर परत नाहीं ना जाणार?"

" नाहीं जाणार. पण कायरे, माझ्या येण्याजाण्याबद्दलच्या गोष्टी कां काढतोस? आपल्या अभ्यासाबद्दल कांहीं बोल कीं!" बोलतां बोलतां तिची दृष्टि कांहींतरी चमत्कारिकच झाली होती, आणि कंठ दाटून आला होता.

तिच्या बोलण्याचा रोख मला विशेष समजला नाहीं. मी म्हटलें -- " मग आत्याबाई, आतां तूं परत जाऊं नकोस! मी तुला जाऊं देणार नाहीं."

" तूं कसा जाऊं देणार नाहींस ? "

" बस, नाहीं जाऊं देणार ! "

तिनें उपरोधपूर्ण स्मित केलें. म्हणाली—

" तूं जाऊं देणार नाहीं म्हणतोस, मग प्रथमच कां नाहीं अडवून धरलंस ? आतां कांहीं होऊं शकत नाहीं. "

तिची ती मुद्रा पाहून मला त्वेष चढला. मी म्हटलें — कां होऊं शकत नाहीं ? सर्व कांहीं होऊं शकतं ! तुला कोण कसं घेऊन जातं तें मी पाहीन ! "

आत्याबाई हंसून म्हणाली—" अरे वा, मोठा वीरच कीं नाहीं तूं ? पण या बाबतीत तुझ्या आत्याबाईला कांहीं विचारशील कीं नाहीं ? ती इथली नाहीं आहे बाबा, तिकडची आहे. तिच्या पतिची मालमत्ता हिसकावून घेणारा तूं कोण ? "

तिच्या म्हणण्याचें मर्म मला नीटसें समजलें नाहीं. पण तिच्या वाणींतील वेदना माझ्या हृदयाला चाटून गेल्याशिवाय राहिली नाहीं. मी ओळखलें होतें कीं, सासरच्या गोष्टी निघाल्या म्हणजे तिच्या मनाला कष्ट होतात. पण त्यांत एवढें मन द्विधा होण्यासारखें काय आहे ? तिकडे जाणें आवडत नाहीं तर जाऊं नये -- संपलें !

पण त्यावेळीं मी जितक्या सहज रीतीनें 'संपलें' म्हटलें तितकी ती गोष्ट सोपी नव्हती हें आज मला चांगलें समजतें. लग्नाची गांठ म्हणजे केवळ दोन जीवांना परस्पराशीं बांधणारी गांठ नसून समाजाशीं बांधणारी गांठ आहे. मनास येईल तेव्हां

ती तोडतां येईल काय ? विवाह हा केवळ भावनेचा प्रश्न नसून, व्यवस्थेचा प्रश्न आहे. तो प्रश्न असातसा टाळतां येणार नाहीं. ती गांठ अशी आहे कीं एकदां बांधल्यानंतर सोडतां येत नाहीं, आपोआप तुटली तर कांहीं इलाज नाहीं! परंतु 'तुटणें' हें कधीं कोणाला श्रेयस्कर झालें आहे? त्यावेळीं इंग्रजी चवथींपांचवींत शिकणाऱ्या माझ्यासारख्या पोराला हें सर्व समजणें शक्य नव्हतें. म्हणून त्यावेळीं मोठ्या आत्मविश्वासानें मी आत्याबाईला आश्वासन दिलें कीं तुला इथून कोणी नेऊं शकणार नाहीं; पाहूं या कोण तुला न्यायला येतो; तूं काळजी करूं नकोस आत्याबाई; हा प्रमोद मोठा झाल्यावर खूप पैसे मिळवील आणि तुझी चांगली सेवा करील व तुला मुळींच कष्ट पडूं देणार नाहीं!

माझ्या बोलण्यानें आत्याबाईला मुळींच धीर आला नाहीं असें मी म्हणणार नाहीं. तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारची संतोषाची छटा उमटलेली स्पष्ट दिसलीच कीं! जरा हसून ती म्हणाली— " तूं असा वीर आहेस, प्रमोद, तर मग माझी होडी पैलतीराला जाणार खास! काय रे, हल्लीं तुझा पहिला नंबर असतो कीं नाहीं ? "

पहिला नंबर असो कीं शेवटला असा, त्यावेळीं तरी माझी एवढीच इच्छा होती कीं आत्याबाईच्या मनाचे क्लेश नाहींसे करायचे! मी विचारलें " मला खरंखरं सांग, तुला तिकडे जायची इच्छा आहे कीं नाहीं ? "

ती म्हणाली – " खरं सांगू – ? "

" अगदीं खरंखरं सांग. "

ती हंसून म्हणाली – " कां खरंखरं सांगू रे ? "

मी जरा रागावून म्हटलें—" नाहीं ना सांगायचं तुला ?"

" बरं अगदीं खरं सांगतें हं ! मला तुझ्याजवळ रहायचंय्- ठेवशील ? " असें म्हणून तिनें माझ्याकडे अशा दृष्टीनें पाहिलें कीं मी नरमलों. तिनें लागलीच मला ओढून आपल्या मांडीवर घेतलें. एकाएकीं मला घट्ट आवळून ती म्हणाली –"मला एक सांग – तुला छड्या खाणं आवडतं कारे ? "

" छड्या ? " मीं आश्चर्यानें विचारलें.

" हं ! मी तुला एकदां खूप छड्या मारणार आहे. पाहीन तुला कसं वाटतं तें ! "

मला तिच्या बोलण्याचें आश्चर्य वाटलें. मी म्हटलें—"असं काय बोलत्येस तूं ? "

" खरंच सांगतें प्रमोद ! दुसऱ्या कोणाला नाहीं सांगत, तुलाच सांगतें. छडया खाणं मला तर आवडत नाहीं बाई-इथंहि नाहीं अन् तिथंहि नाहीं !

मी आश्चर्यानें विचारलें — " म्हणजे काय ? तुला तिथं मारतात कीं काय ?"

" होय तर ! "

" छडया मारतात ? "

" हो छडया— "

" कां मारतात ? "

" मी वाईट आहे म्हणून. "

मला तिच्या तोंडाकडे पाहवेना. दुःखावेगानें मी माझें तोंड तिच्या कुशींत खुपसलें. त्यावेळीं मला वाटलें कीं, आपणच तिला आपल्या मांडीवर घेऊन हळुहळू थोपटीत तिला म्हणावें— " आत्याबाई, तें सर्व विसरून जा ! चांगलें, वाईट सर्व कांहीं विसरून जा! असेंही एक स्थान आहे कीं, जेथें वाईट नाहीं अन् छडयाहि नाहींत. आपण दोघे तिथं जाऊन राहूं. " असा विचार करीत मी तिला तसाच बिलगून राहिलों. आत्याबाईचें अंतःकरण भरून आलें असून तिच्या डोळ्यांतून एकदोन अश्रुबिंदू माझ्या तोंडावर पडले असें मला वाटलें.

मला सर्व गोष्टी माहीत नाहींत, परंतु बाबा आणि आत्याबाईचे पति यांचा पत्रव्यवहार चालू होता, आणि तोही बरेच दिवस चालू होता एवढें मला कळलें. तीन महिने आत्याबाई आमच्या घरीं राहिली. शेवटीं असें ठरलें कीं तिच्या पतीनें तिला घेऊन जावें. बाबांनीं तर इतकेंहि सांगितलें कीं यापुढें जर ती आपल्या नवऱ्याला न विचारतां घरीं आली तर तिला या घरांत आश्रय मिळणार नाहीं ! तिच्या पतीनें बाबांच्या देखत तिच्यावर कांहींतरी आरोप केले होते, ते मात्र त्यांनीं क्षमायाचनापूर्वक परत घेतले.

एकदां मी बाबांजवळ बसलों होतों. इतक्यांत आत्याबाई तेथें आली आणि मुकाट्यानें बाजूला एका खुर्चीवर बसली.

बाबांनीं विचारलें, " काय मृणाल, कसं वाटतं तुला आतां ? "

" बरं आहे. "

" इथं तुला चैन पडत नाहीं असं दिसतं ! "

मृणाल गप्प बसली.

" या रविवारीं ते येणार आहेत. अजून पांच दिवस आहेत. मिना, आतां असं कांहीं करूं नको बरं बाळ ! ते सद्‌गृहस्थ आहेत म्हणून प्रकरण थोडक्यांत मिटलं. असं कोणी मुली करतात का ? आतां असं आहे, लहानसहान भांडणं होतातच कधींमधीं ! परंतु पतीच्या घराशिवाय स्त्रीला दुसरा आसरा कोणता आहे बरं ? पत्नीचा धर्म पति हें खोटं नाहीं बरं मृणाल ! पतीचं घर हेंच तिचं घर. तिचा धर्म, तिचा मोक्ष, तिचं कर्म, सर्वकांहीं तिथं आहे ! समजलं बाळ ? "

बाबांच्या बोलण्यांत लाचारीची छटा दिसत होती. आत्याबाई गप्प बसली होती. थोड्यावेळानें बाबा म्हणाले — " मृणाल, तुला कांहीं बोलायचं आहे काय ? सांगना—बाळ ! "

आत्याबाई खाली पहात म्हणाली — " मला बरं नाहीं वाटत. मला आतांच परत नाहीं जायचं ! "

" आतांच नाहीं जायचं म्हणजे काय ? "

मृणाल कांहीं बोलली नाहीं.

" पण ते आतांच घेऊन जाऊं इच्छितात — "

मृणाल गप्पच होती.

या तिच्या मौनव्रतामुळें बाबा जरा रागावले. आधीं माझ्याकडे वळून ते म्हणाले, " जा रे प्रमोद, तूं आपला अभ्यास करीत बस." मी लागलीच न उठतां गोंधळून इकडेतिकडे पाहूं लागलों असें पाहून ते रागावून म्हणाले, " ऐकूं येत नाहीं का रे ? चल उठ !" मी तेथून उठून बाहेर गेलो, पण बाहेर जाऊन एका बाजूला उभा राहिलों. मी गेलों असें पाहून बाबा म्हणाले, " मृणाल, खरं सांगायचं ह्मणजे सध्यां तुला पाठवावं असं मलाहि वाटत नाहीं. तुझी अवस्था नाजूक आहे. पण तूंच सांग मी काय करूं ?"

मृणाल कांहीं बोलली नाहीं.

बाबा उठून खोलींत येरझारा घालूं लागले. बराच वेळ तेहि कांहीं बोलले नाहींत. नंतर म्हणाले, " मृणाल, खरा प्रकार काय आहे मला एकदां सांग पाहूं." मृणाल कांहींच बोलली नाहीं, तेव्हां पुन्हां त्यांनीं येरझारा सुरु केल्या. पुन्हां एकदां मध्येंच थांबून म्हणाले, " मृणाल, तुला कष्ट होत आहेत हें मला दिसत का नाहीं ? पण काय चाललं आहे हें तूं मला सांगितलं नाहींस तर मला कळायचं कसं ? मी काय करणार ? मिना, तुला आपल्या बाबांची आठवण असेलच. तूं ल्हान असतांनाच ते आपल्याला सोडून गेले. आपल्या आईला तर तूं धड पाहिलेंहि नाहींस ! मीच तुला आईबापांच्या ठिकाणीं झालों. मला सांगणार नाहींस तर दुसऱ्या कुणाला सांगणार ? खरं सांग बाळ, काय प्रकार आहे ?"

आत्याबाई ह्मणाली – " कांहीं नाहीं हो दादा ! पण मला जायचं नाहीं. "

तुला जायचं नाहीं हें मला दिसतंच आहे. पण बाळ, असं कसं ह्मणून चालेल ? आणि अशी किती दिवस तूं जाणार नाहींस ? "

" अजीबात जाणार नाहीं ! "

बाबा जरा चमकून म्हणाले – " मग काय करणार आहेस ? "

" तुम्हीं इथून हाकलून लावलंत तर इथूनहि निघून जाईन. "

आतां बाबा जरासे रागावले.

" कुठं जाणार आहेस ? "

" बाबा मला लहानशी सोडून जिकडे गेले तिकडचा रस्ता कोणी दाखविला तर तिकडे जाईन. "

यानंतर मला कांहीं ऐकूं आलें नाहीं. बाबा जोरजोरानें येरझारा घालीत होते. त्यांच्या पावलांचा आवाज मात्र ऐकूं येत होता. घसा बसला असतांना मनुष्य साफ करतो तसला आवाजहि एक दोनदां आला. दोन, तीन, चार, पांच मिनिटें मी वाट पाहिली. बाबांच्या पावलांचा आवाज, त्यांचें मधून मधून खांकरणें आणि क्वचित् मोठ्यानें टाकलेला निःश्वास एवढेंच काय तें मला ऐकू येत होतें. शेवटीं मी हळूच तेथून पाय काढला.

यानंतर जेव्हां आत्याबाई भेटली तेव्हां मी तिला विचारलें—
" आत्याबाई, बाबा तुला पाठविणार ? "

ती रागावून म्हणाली, " पुरे रे प्रमोद, तूं याविषयीं बोलत जाऊं नको ! जा आपला आपलं काम करीत बस. "

ती कां रागावली हें मला कळलें नाहीं. मीहि त्या दिवशीं पुन्हां तिच्याकडे गेलों नाहीं. संध्याकाळीं तीच माझ्याजवळ आली आणि मला जवळ घेऊन अगदीं रडण्याच्या बेतांत आली. म्हणाली, " तूं रागावलास प्रमोद ? "

थोड्या वेळानें पुन्हां म्हणाली, " बाबा, मला पाठवणार आहेत. जाऊं ना मी ? "

मी काय उत्तर देणार ?

तिनें माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें— " मला गेलं पाहिजे, नाहीं का प्रमोद ? "

मी बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, " बरं तें जाऊं दे ! मला असं सांग, मी गेल्यावर तूं माझी आठवण ठेवशील ?"

" म्हणजे काय ? मी मागेंसुद्धां तुझी फार आठवण काढीत असे, आत्याबाई. "

" मी मेलें तरी माझी आठवण ठेवशील ? "

त्यावेळीं मला सर्व समजूं लागलें होतें. मी म्हटलें – " असं कांहीं बोलूं नको आत्याबाई ! मला नाहीं ऐकायचं — "

" बरं एक सांग – तूं मोठा झाल्यावर मी तुला बोलावलं तर तूं येशील ? "

" तावडतोब येईन ! "

" कसल्याहि स्थितींत मी असलें तरी ? "

" अगदीं ! "

" पहा बरं ! मी सांगतें तूं येणार नाहींस, मी तुला बोलावणारहि नाहीं. तुम्हीं सर्व मला विसरून जा. मी गेलें म्हणजे मी मेलें असेंच समजा. त्यानंतर मी तुम्हां कोणाला मुळींच त्रास देणार नाहीं. "

थोडया वेळानें तिनें विचारलें — " नवऱ्याचं घर म्हणजे काय असतं तें तुला माहीत आहे रे ? "

" नाहीं. "

" स्वर्ग असतो तो — "

मी मान्य केलें. " बरं स्वर्ग असतो. "

पण तेवढ्यानें तिच्या मनाचें समाधान झालें नाहीं. ती म्हणाली-

" स्वर्गच आहे तो ! जिला तो स्वर्ग वाटत नाहीं ती दुर्दैवी आहे. "

मी बोललों नाहीं. ती पुढें म्हणाली —

" स्वर्ग कसा असतो तुला माहीत आहे रे ? "

आणि झटकन् आपणच उत्तर दिलें—" स्वर्गात सगळीकडे आनंदी – आनंद आहे ! तिथं देवता राहतात– "

दुसरे दिवशीं सकाळीं तिची मनःस्थिति पूर्ववत् झालेली दिसली. तिनें आईला सांगून धोब्याला कपडे घेऊन जाण्याकरितां निरोप धाडला. रविवारपर्यंत कपडे आले पाहिजेत,

कारण मग जायचं आहे ना? दोनचार लहानमोठ्या वस्तु बाजारांतून मागवून घेतल्या. आपलें सामान आवरण्याची तिची गडबड सुरू झाली. या पेटींतील सामान त्या पेटींत, त्या पेटींतील या पेटींत, असें सारखें चाललें होतें. तिनें ठरविलें कीं या खेपस बरोबर कांहीं पुस्तक न्यायचें नाहीं; पुस्तकें एकंदर वाईटच; 'त्यांना' तीं आवडत नाहींत; त्यांनीं वेळ फुकट जातो; बस, या खेपेस नवीं काय, जुनीं काय, कोणतीच पुस्तकें न्यायचीं नाहींत!

दुपारपर्यंत तिची ही गडबड चालू होती. नंतर जेवून आपल्या खोलींत येऊन पडली आणि एकदम तिचें डोकें दुखूं लागलें. मी म्हटलें — "आत्याबाई, काय होतंय् तुला?"

"डोकं दुखतंय् —"

"मी चेपूं?"

"नको."

"बाम चोळतों —"

"नको."

"कोलनवॉटरची घडी ठेवूं का?"

"अरे बाबा, नको-नको-नको!"

तिला दोनतीन दिवस झाले अपचन झालें आहे असें मला कळलें. पोट अगदीं दब्ब झालें होतें.

मी म्हटलें — "डॉक्टरला —"

"नको रे, डॉक्टरबिक्टर कोणी नको मला."

" मग — ? "

" कांहीं नको — आपोआप बरं वाटेल. "

तिच्या वेदना वाढत गेल्या. तिसऱ्या प्रहरीं अतिशय तळमळ सुरू झाली. पण ती एकटीच पडली होती, कोणालाहि तिनें जवळ बोलाविलें नाहीं. मला कितीकदां वाटलें कीं बाबांना सांगावें, पण आत्याबाई एकदां अशी रागावली कीं पुन्हां मला धीर झाला नाहीं. आतां तिच्या पोटांत फार दुखूं लागलें होतें. मधेंच तें थांबे, पुन्हां वेदना सुरू होत; जणूं कांहीं कोणी आंत बसलें असून मधूनमधून दम घेऊन तिची आंतडी पिळून काढीत होतें ! वेदनांमुळें तिचें अंग खळबळून निघत होतें. मी तें सर्व कोणाला न कळवितां पहात राहिलों कसा हेंच मला समजत नाहीं ! मी कोणाला तरी सांगायला निघावें आणि तिनें प्रत्येक खेपेस मला शपथ घालून थांबवावें असा प्रकार चालला होता. ती म्हणे, तूं जर कोणाला सांगितलंस तर माझ्या मरणाचं पाप तुला लागेल !

मी म्हटलें — " मग कसं व्हायचं आतां ? "

" जाऊं दे रे, पोटांत दुखतंय् थोडंसं, होईल बरं जराशानें. हें पहा, बाजारांत जाणार असशील तर जमालगोटा घेऊन ये थोडासा. काय, लक्षांत राहील कां--जमालगोटा ? "

आतां मात्र मला जरा शंका येऊं लागली. मी विचारलं, " जमालगोटा म्हणजे काय असतं ग ? "

तशा वेदनांतहि किंचित् हंसून ती म्हणाली—"तूं फार शहाणा होत चालला आहेस प्रमोद! तें कांहीं विष नाहीं! आणशील ना मग?"

"त्यानें बरं वाटेल तुला?"

"हो, बरं वाटेल. मग जाशील ना?"

मी जमालगोटा आणून दिला. तो घेतल्यावर तिचे जे हाल सुरू झाले त्यांचें वर्णन करणें कठीण आहे! आईबाबा दोघेहि चिंताक्रांत झाले. शंका अशी वाटली कीं हिचा गर्भपात तर होणार नाहीं! तसें कांहीं झालें नाहीं म्हणा; पण बाकी सगळें कांहीं झालें. तीन दिवसांत तिचा चेहरा इतका उतरला कीं त्याकडे बघवेना! जशी कांहीं मरून पुन्हां जिवंत झाली होती! मला तिची दया आली. परंतु दया मर्यादेच्या पलीकडे गेली म्हणजे तिचें क्रोधांत रूपांतर होतें कीं काय? रागारागानें मी तिला नाहींनाहीं तें बोललों. तिनें मुकाट्यानें सर्व ऐकून घेतलें. शेवटीं ती म्हणाली, "तूंहि मलाच बोलणार ना प्रमोद?"

"नाहींतर कुणाला बोलूं?"

"बरं बाबा, बोलून घे."

हे शब्द तिनें अशा रीतीनें उच्चारले कीं माझा राग पार कुठल्याकुठें नाहींसा झाला! माझें अंतःकरण भरून आलें. मी म्हटलें, "मग तूं हें काय केलंस बरं?"

"मी काय केलं?"

" जें झालं तें तूं आपल्या हातांनीं करून घेतलंस एवढं मला माहीत आहे."

यावर ती थोडावेळ माझ्यावर दृष्टि खिळवून स्वस्थ राहिली. नंतर म्हणाली, " खरं सांगू प्रमोद, मी कांहींच केलं नाहीं. मला बुद्धिभ्रम झाल्यासारखं झालं आहे. कांहीं सुचत नाहीं ! मी काय करीत आहे हें माझं मलाच समजत नाहीं. आणि मला योग्य मार्ग दाखविणारं तरी इथं कोण आहे ? आपल्या मनांतलं दुःख कोणाला सांगू ? प्रमोद, मला कांहीं समजेनासं झालंय्. अशा वेळीं तूंहि मला दोष लावूं लागलास तर मी जावं कुठं ? "

तिच्या मनांतील रहस्य मला कळलें नाहीं, परंतु मला हें ऐकून फार वाईट वाटलें. मी म्हटलें, " तुझी काय इच्छा आहे ?"

" इच्छा काय असणार ? "

" मग कां उगाच आपल्या शरीराचा नाश करून घेतेस ? "

" शरीराचा नाश कुठं करून घेतें ? तूं काय म्हणतोस तें माझ्या लक्षांत येत नाहीं. बरं मग, काय करूं या शरीराचं सांग तरी ! "

माझ्या मनाला अतिशय कष्ट होत होते; पण ते कष्ट अस्पष्ट स्वरूपाचे, केन्द्रहीन, अहेतुक होते ! मी म्हटलें – " हें पहा आत्याबाई, तूं एकदां बाबांना सर्व गोष्टी स्पष्टपणें कां सांगत नाहींस ? उगाच काय भ्यायचं ? मी पाहतों तुझ्यावर कोण जुलूम जबरदस्ती करतो ! "

आत्याबाई चमत्कारिक दृष्टीनें मजकडे पाहूं लागली. ती म्हणाली – " काय सांगूं ? आणि जुलूम जबरदस्ती कसली ? तूं काय म्हणतोस तें मला समजत नाहीं. प्रमोद, तूं अजून लहान आहेस, तुला समजत नाहीं — "

मला लहान म्हटल्याबरोबर मला राग आला. मी म्हटलें– " बरं, मी लहान आहे आणि मला कांहीं समजत नाहीं ! पण तूं एकदां स्पष्ट सांग कीं मला जायचं नाहीं आणि मग मी पाहतों तुला कोण घेऊन जातो तें ! तुला काय वाटतं मी म्हणजे कोणीच नाहीं ? "

कां कुणास ठाऊक, आत्याबाई त्यावेळीं थोडीशी गांगरली. ती म्हणाली, " छे–छे ! बाबा, असं बोलूं नये ! मुलीची जात म्हणजे दुसऱ्याचं धन. बापाचं घर म्हणजे आपलं घर असं तिला समजून चालत नाहीं ! मी त्याहून निराळी कां आहे ? शिवाय तूंच पहा, मला वडील तरी कुठं आहेत ? ते असते तर – "

मी विवश होऊन जवळ जवळ ओरडलों, " वडिलांचा काय इथं संबंध ? काय बोलतेस तूं आत्याबाई ? माझे बाबा तुझे कोणी नाहींत ? आई कोणी नाहीं ? मी कोणी नाहीं ? "

तिनें शांतपणें उत्तर दिलें, " कोणी नाहीं बाबा ! "

मी तिच्या गळ्यांत पडलों आणि म्हटलें – " मी कोणी नाहीं ? "

तिनें मला छातीशीं घट्ट धरलें. ती म्हणाली, "तूं आहेस रे बाळ, तूं आहेस! तूंच काय तो आहेस! नाहीं तर हें पोटां-तलं कर्म घेऊन मी जगलें तरी असतें कां?"

रविवारीं तिचे पति आले. आत्याबाईची अवस्था पाहून त्यांना फार आश्चर्य वाटलें. ते लगेच म्हणाले, "इथलं पाणी मानवलेलें दिसत नाहीं. पाहा ना काय अवस्था झाली आहे! काय होत होतं — डायऱ्हिया? तीन दिवस सारखा डायऱ्हिया आणि ओकाऱ्या? च्-च्! डॉक्टर कोण होता? डॉक्टरहि चांगले मिळत नाहींत असलं कसलं गांव हें? जिल्ह्याचे सिव्हिल सर्जन— "

या त्यांच्या उद्गारावरून आत्याबाईच्या प्रकृतिबद्दल त्यांना किती काळजी होती तें स्पष्ट दिसलें. माझ्या देखतच ते बाबांना म्हणाले, "अशी स्थिति असतांना मला तार कां केली नाहीं? मी सर्व व्यवस्था केली असती. आमच्या इकडचं दूध—तूप कसं असतं, तुम्हांला माहीतच आहे. म्हणतात ना, तूप आणि पुरुष पश्चिमेकडचेच! कितीहि प्रकृति बिघडली असली तरी बघतां बघतां सुधारते — "

यावर बाबा कांहींच उत्तर देऊं शकले नाहींत. त्यांच्या चेहऱ्यावरून असें दिसत होतें कीं जणूं कांहीं 'सगळा दोष माझ्याकडेच आहे' असा ते मुकाट्यानें कबुलीजबाब देत होते! त्यांनीं एकदां बोलूनहि दाखविलें कीं, "तिची स्थिति ही अशी, तेव्हां थोडे दिवस थांबून गेलां तर?"

पण स्थिती अशी होती म्हणूनच तिच्या पतींचें कर्तव्य अधिकच स्पष्ट होतें ! ते ह्मणाले, " आपणच विचार करा, अशा स्थितींत तिला इथं ठेवून जाणें हें तरी कितपत योग्य आहे ? पहा तर खरे, तिथं गेल्यावर थोड्याच दिवसांत तिची प्रकृति पुन्हां खडखडीत बरी होते कीं नाहीं ! आणि खरं सांगायचं ह्मणजे लहानसहान आजारांकडे इतकं लक्ष देणं ह्मणजे त्यांना भलतंच महत्व देण्यासारखं आहे. बेफिकिरी हें सर्वांत उत्तम औषध आहे ! " असें ह्मणून जणूं कांहीं केवढें मोठें तत्व आपण प्रतिपादिलें अशा मुद्रेनें बाबांकडे पाहून ते हँ हँ करून हंसले.

ते पुढें बोलूं लागले, " आपण तिला काय ते सांगितलंच असेल. मनुष्यानें आपली पोझिशन् ओळखून वागायला नको कां ? शिवाय जगाचीहि भीडमुर्वत बाळगली पाहिजे. असं पहा, लेकी—सुना यांच्या वागणुकींसंबंधीं कांहीं ठराविक नीति-नियम असतात. आपल्या जुन्या पद्धति या अशा आहेत ! आपलं कुलशील जें चालत आलं आहे तें कायम राहिलं नाहीं तर राह्यलं काय ? या गोष्टी जरा तिला समजावून द्यायला पाहिजेत. मी आपल्याकडून थोडंबहुत करतोंच आहे, पण आपणच पहा, आपण चार गोष्टी सांगितल्या तर त्याचा परि-णाम जरा जास्त होईल. "

मी इंग्रजी पांचवींत शिकणारा मुलगा. मला कांहीं समजत असेल किंवा नसेल, परंतु हें त्यांचें बोलणें मला मुळींच आव-

डल नाहीं. कां कुणास ठाऊक, मला त्यावेळीं अतिशय संताप आला होता. असें वाटलें कीं तिथल्या तिथें फाडकन् असें कांहीं तरी बोलावें कीं — ! वास्तविक इतका संताप येण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण बाबांच्या मनांतील भावनांच्या कोंडमाऱ्याची छटा त्यांच्या चेहऱ्यावर उमटलेली पाहून मला अतिशय चीड येत होती. कसें मी माझें मन आवरून धरलें कोणास ठाऊक ! परंतु माझ्या हातून कांहीं कमीं जास्त झालें नाहीं येवढें खरें !

बाबा त्यांना उत्तरादाखल म्हणाले — " हो–हो, बरोबर आहे—"

एकाएकीं आत्याबाईचे पति माझ्याकडे वळले आणि म्हणाले, " हं काय हो, तुमचं नांव काय ? ओः आठवलं, प्रमोद नाहीं का ? "

असेल माझें नांव प्रमोद, त्याची यांना कां उठाठेव ? मीं उत्तरच दिलें नाहीं.

" काय शिकतोस रे? "

" या सहामाहीच्या परीक्षेंत नापास झालों आहे. "

" नापास झालास ? छे – छे, हें चांगलं नाहीं ! कोणत्या यत्तेंत ? "

मी गप्पच राहिलों. कां यांना उत्तर द्या? नाहींच देणार मी.

" घाबरूं नको बाळ. सांग कोणत्या यत्तेंत शिकतोस ? "

" नापास झालों म्हणून मी घाबरत नाहीं—"

त्यांनीं मोठ्या प्रेमानें म्हटलें—

" असं कसं चालेल बाबा ? नापास होण्याची तर भीति वाटायलाच पाहिजे ! जे लोक लहानपणीं मन लावून अभ्यास करतात, तेच पुढें कांहींतरी करून दाखवितात, समजलं ? अच्छा, इकडे ये. ये रे माझ्याजवळ ये ! "

मी आपल्या जागेवरून हाललों नाहीं.

बाबा म्हणाले—"जा बाळ, जा त्यांच्याजवळ—"

मी छाती पुढें काढून त्यांच्यासमोर उभा राहिलों. आपल्या हातांनीं माझे खांदे धरून हालवीत ते म्हणाले—

" चवथींत आहेस कीं पांचवींत ? "

" पांचवींत. "

" हें पहा, कोणत्याहि वर्गांत नापास होतां कामा नये ! बरं, आतां तुला काय पाहिजे—एक आणा कीं दोन आणे ? " असें म्हणून त्यांनीं आपल्या खिशांत हात घातला.

माझ्या मनांत काय दुष्ट विचार आला सांगू ? वाटलें त्यांना सांगावें कीं वाटेल तर मीच तुम्हांला एक आणा देतों, पाहिजे तर दोन आणे देतों, पण या तुमच्या लांबलांब अणकुचीदार मिशा मला ओढून पहायच्या आहेत त्या ओढूं द्या एकदां; एवढेंच काय, तेवढ्याकरितां मी आठ आणेहि द्यायला तयार आहे !

त्यांनीं दोन झांकलेल्या मुठी माझ्यापुढें करून म्हटलें—

" हं बोल, कोणची पाहिजे ? "

मी नुसता बघत राहिलों. कांहीं बोललों नाहीं.

" चल, लवकर सांग. नाहींतर दोन्हीं मुठींतला माल उडून जाईल आणि मग बघतच राहशील. "

मला असा राग आला होता ! मी म्हटलें—

" पाहिजे असले तर मीच तुम्हांला दोन आणे देतों–"

हें ऐकून ते थोडे ओशाळल्यासारखे होऊन 'हो-हो-हो-हो' म्हणून मोठ्यानें हसले. त्यांच्या हसण्यांतील कृत्रिमपणा आणि किंचित् त्यांचा ओशाळेपणा पाहून मला जरा बरें वाटलें. मी म्हटलें —

" मी पांचव्या यत्तेंत आहे, आणि गेल्या परीक्षेंत माझा पहिला नंबर आला आहे. "

त्यावर ते पुन्हां हसले – " हो–हो–हो–हो–"

ते माझ्यावर रागावले असावेत असें मला वाटलें, आणि कां कुणास ठाऊक, त्यांच्या रागावण्यानें मला मनांतल्या मनांत आनंद झाला. बाबांचा सूड मी घेऊं शकलों या विचारानें समाधान वाटलें.

दुसऱ्या दिवशीं जाण्याची तयारी होऊं लागली. आत्याबाई मला म्हणाली — " प्रमोद, मी कांहीं कमीजास्त बोललें असेन तें मनावर घ्यायचं नाहीं हं ! आतां तुम्हां सर्वांची पुन्हां केव्हां भेट होईल कोणास माहीत ! "

मी निश्चय केला होता कीं आत्याबाईकरितां आपण आपलें हृदय अगदीं घट्ट करायचें. परंतु ती समोर आल्याबरोबर, तो

घट्टपणा पार वितळून गेला. तिचे हे शब्द ऐकून माझ्या हृद-याचें पाणी पाणी झालें. कांहींतरी बोलायचें म्हणून मी बोललों, "आत्याबाई, मला पत्र लिहीत जाशील ना ?"

ती घुटमळत म्हणाली–" पत्र ना ? असं पहा–"

" तें कांहीं नाहीं, लिहिलंच पाहिजे ! तूं मला बोलावलंस तर मी ताबडतोब धांवत येईन. मी आतां आगगाडीनें प्रवास करूं शकतों."

" हो रे बाळ, तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला बोलावणार मी ? पण कायरे, एकटा प्रवास करून तूं माझ्याकडे येशील ?"

" हो–हो, अगदीं खात्रीनं येईन ! तूं बोलावलंस तर सगळीं कामं बाजूला ठेऊन येईन."

आत्याबाई हलकेच माझ्या गालावर एक चापटी मारून म्हणाली, – " वेडा !"

या खेपेस जातांना आत्याबाई रडतरडत आईच्या पायां पडली व खालीं मान घालून समोर उभी राहिली. तिच्या तोंडांतून शब्द फुटेना. आईनें गंहिवरून तिला आपल्याजवळ घेऊन म्हटलें, " मिना, असं काय बरं ? मी तुला लवकर बोलावून घेईन हं ! जा बाळ. आणि हें बघ, आपला संसार नीट सांभाळ आणि त्यांच्या जीवाला जपत जा बरं मिना !"

आईनें गद्गद कंठानें तिला तऱ्हतऱ्हेचे आशीर्वाद दिले. आत्याबाई खालीं मान घालून जणूं कांहीं ते झेलीत होती. सौभाग्यवती हो, पुत्रवती हो, इत्यादि सर्व आशीर्वाद तिनें

इतक्या नम्रभावानें स्वीकारले कीं, जणूं कांहीं या आशीर्वादांच्या भाराखालीं चेंगरून आपल्याला मरण आलें तरी आपण धन्य होऊं असें तिला वाटत असावें !

बाबांसमोर तर आत्याबाई स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. बाबांनीं चटकन् खिशांतला रुमाल काढून दोनतीनदां आपल्या तोंडावरून हात फिरविला आणि काय बोलावें हें न सुचल्या-मुळें, 'हें काय बरं बाळ ?' 'छेः असं नाहीं करूं' 'रडायचं का अशा वेळीं ?' 'वेडी रे वेडी – चल, रडूं नको' असें कांहींतरी तुटकतुटक बोलून पटकन् तिच्यासमोरून निघून गेले आणि बरोबर नेण्याचें सामान–पेट्याबिट्या, वळकट्याबिळकट्या मोजूं लागले व गड्यांना उचलायला सांगूं लागले. जणूं कांहीं आपण अतिशय कामांत आहों आणि आपल्याला तरी कुठं तसा बोलायला वेळ आहे ?––

मी अगदीं निश्चय केला होता कीं आपण मुळींच रडायचें नाहीं, आणि खरोखरच मी डोळ्यांतून एक टिपसुद्धां काढलें नाहीं. माझ्या हातून दंगाबिंगा वगैरे कांहीं कमीजास्त प्रकार कां घडत नाहीं, याबद्दल माझी मलाच चीड येत होती ! माझ्याशीं कोणी भांडण उपस्थित करील तर बरें होईल असें मला वाटूं लागलें. कोणाशीं तरी दोन हात करण्याची प्रबळ इच्छा होत होती ! आत्याबाई ? – उंः ती गेली तर गेली ! मला काय करा-यचें आहे तिच्याशीं ? मला कोणाशींच कांहीं करायचें नाहीं ! माझें काय तें मी एकटा पाहून घेईन – होय एकटा, एकटा !

माझ्याशीं बोलूं नका, कोणीं बोलूं नका! मी आत्याबाईची मुळींच आठवण ठेवणार नाहीं. ती इथून कां जात आहे— मी इथें असतांना कां चालली आहे? आणि तिला नेणारा हा तिचा नवरा तरी असा कोण मोठा तिस्मारखां आला आहे? बरें आहे, घेऊन जायचें असेल तर जाऊं दे, माझें काय? टळा एकदांचे!

एक प्रकारचें विलक्षण दडपण माझ्या मनावर पडलें होतें. तें धड मला रडूं देईना कीं कांहींच करूं देईना! परिणाम असा झाला कीं आत्याबाई जावयास निघाली त्याक्षणीं एकाएकीं माझें डोकें इतकें भणभणूं लागलें कीं मी पळत पळत पूर्वीच्या आत्याबाईच्या खोलींत जाऊन स्वतःस कोंडून घेतलें. दार बंद केल्यामुळें काळोख झाला, तरी दोन्हीं हातांनीं जोरानें डोळे झांकून घेतले आणि मुकाट्यानें तसाच खोलीच्या मधोमध नुसता उभा राहिलों. जणूं कांहीं मनांत अशी आशा होती कीं तेवढ्यानें कांहीं तरी चमत्कार घडून येईल, भूकंप होईल, कांहीं ना कांहीं तरी होईल आणि शेवटीं सर्व कांहीं ठीक होईल! तिथें उभ्या उभ्या मनांत आलें कीं आतां श्वास कोंडून धरावा, बेशुद्ध व्हावें, आणि —

इतक्यांत इकडे तिकडे धांवपळ करीत आईनें गद्गद कंठानें मारलेली हांक ऐकूं आली "प्रमोद! प्रमोद!"

मी कांहीं बोललों नाहीं. नाहींच बोलणार! प्रमोद आहे कुठं? प्रमोद नाहींच आहे! मी प्रमोदला ओळखीत नाहीं! मला कांहीं माहीत नाहीं —

" अरे प्रमोद ! ए प्रमोदभाऊ ! "

आईचा शब्दच असा होता की मला राहवलें नाहीं. मी तेथूनच ओरडून म्हणालों, " काय आहे ग ? मला कांहीं ऐकूं येत नाहीं ! "

" कुठं आहेस रे तूं ? तुझी आत्याबाई तुला बोलावतेय्–"

मी खोलींतून बाहेर आलों. कांहीं-एक न बोलतां मुकाट्यानें बाहेरच्या ग्यालरीकडे चालूं लागलों. तेथें येऊन पाहतों तों सर्व तयारी झाली होती. आत्याबाईच्या नवऱ्याची सारखी घाई चालली होती – " चला, चला ! " आत्याबाई खालीं मान घालून उभी होती. माझी वाट पहात होती काय ? मी जवळ जाऊन म्हटलें, " आत्याबाई, काय ग ? "

तिनें एकदम माझ्या गळ्याला मिठी मारली. तिला रडूं कोसळलें.

तिचा नवरा म्हणूं लागला, " चला लवकर, गाडीची वेळ झाली – "

माझ्या खांद्यावर टेकलेलें तिचें डोकें घट्ट दाबीतच मी तिला मोटारीपर्यंत घेऊन गेलों. आत्याबाईच्या नवऱ्यानें बाबांना नमस्कार केला, आणि ते मोटारींत जाऊन बसले. मोटारची घर्रघर्र सुरू झाली. आत्याबाईच्या नवऱ्यानें माझ्याकडे पाहून हसत म्हटलें, " बरं आहे प्रमोदसाहेब, नमस्कार ! " मी जणूं कांहीं कसला तरी कडू घोंट पीत तेथें उभा राहिलों !

---

# ४

मी आतां जरा श्वास घेतों. आतांपर्यंत पुष्कळ सांगितलें. माझें अंतःकरण दुःखानें भरलेलें आहे. अर्थात् गोष्ट सांगायला बसलोंच आहे तेव्हां ती पुरी केलीच पाहिजे. जीवनाला एकदां आरंभ झाला म्हणजे मृत्यु येऊन आपली सुटका करीत नाहीं तोंपर्यंत जगणें प्राप्तच आहे. मध्यें सुटी कुठली मिळते ? परंतु मी जरा श्वास घेऊं इच्छितों.

जगांत बरेंचसें जें कांहीं घडत आहे, तें असेंच कां घडत आहे, तसें कां नाहीं—या प्रश्नाचें उत्तर काय आहे ? उत्तर असेल किंवा नसेल, एवढें स्पष्ट दिसतें कीं, भवितव्य चुकत नाहीं. नियतीचा लेख ठरलेला असतो. त्यांतील एक अक्षरहि इकडच तिकडे होऊं शकत नाहीं. तो लेख बदलत नाहीं, बदलणार नाहीं. परंतु नियतीचा हा अतर्क्य लेख कोणी लिहिला आणि कां लिहिला—हें जाणण्याची इच्छा केव्हांतरी होऊं शकेल कीं नाहीं ?

कदाचित् नाहीं होणार ! ज्ञानी लोकांनीं सांगितलें आहे कीं एक परम कल्याणमय तत्त्वच या सृष्टीमध्यें आपल्या लीलेचा विस्तार करीत असतें. मान्य आहे. न मानून चालेल कसें ? परंतु वारंवार मनांत येतें कीं एकदां मोठ्यानें ओरडून सांगावें कीं, हे परम कल्याणमय, तुझी कल्याणमयी लीला मला समजत नाहीं. तरी पण रोदनक्रंदनांचा आवाज चारी बाजूंनीं माझ्या कानांत घुमत आहे. हें काय आहे ? हे जगत्पित्या, तुझ्या लीलेखालीं हा असला आर्तनाद ?

तुझी लीला होत आहे, आम्ही जगतों—मरतों आहों ! कां जगतों मरतों आहों ? आमची धडपड, आमचे प्रयत्न, काय आहेत—कशासाठीं आहेत ? ........ प्रश्न विचारीत रहा, कांहीं उत्तर मिळत नाहीं !

परंतु उत्तर आहे, आणि तें शब्दहीन भाषेत जगभर घुमत राहिलेलें आहे. आंत आणि बाहेर सगळीकडे तेंच लिहिलेलें आहे. जो वाचूं शकेल तो वाचील – जो जसें वाचूं शकत असेल तसें वाचील. तें उत्तर कधीं संपावयाचें नाहीं. अखिल सृष्टि म्हणजे एक उत्तरच आहे – आपल्या प्रश्नाचें ती स्वतःच उत्तर आहे कीं !

असो; तें जाऊं द्या. जें चार लोक बोलतात तेंच आतां बोलूं. जें आहे तें सर्व कर्मफल आहे असें म्हणूं या. मी आपल्या खोट्या प्रतिष्ठेच्या उंचवट्यावर बसलों आहे. ती कृत्रिम आहे, क्षणिक आहे. त्या प्रतिष्ठेमध्यें हृदय कुठें आहे ?

स्वार्थत्याग कुठें आहे? परंतु इतकें असूनहि मी उच्च स्थाना-वर आहें ना? नामांकित वकील होतों, आज न्यायाधीश आहे. लोकांना कैद — फांशीची शिक्षा देत आहें, समाजांत सन्मान-नीय व्यक्ति म्हणून मिरवीत आहें. चला असेंच म्हणूं या कीं हें सर्व कर्मफलच आहे! परंतु खरें सांगावयाचें म्हणजे हें सर्व कोणत्या कर्माचें फल आहे हें माझें मला माहीत! उत्तम वकीली आणि ही न्यायाधीशाची जागा — यांच्या प्रचंड शरीरांत राईएवढा तरी आत्मा आहे काय? मला तर शंका आहे. मला असेंच वाटतें कीं मीं माझें स्वत्व गमावलें — गमावूं शकलों, तेव्हांच यशस्वी वकील आणि बडा न्यायाधीश होऊं शकलों! आणि माझी मृणालआत्या — जाऊं द्या, ती हकीकत वेळ आली म्हणजे पुढें सांगेन.

माझ्या मनाला राहूनराहून त्रास होत आहे. समाजांत ज्या प्रतिष्ठेच्या उच्च स्थानावर मी उभा आहें, ती कोणाच्या बलि-दानावर अधिष्ठित झालेली आहे, याचा जसाजसा विचार करावा तसतसें मन तिरस्कार आणि ग्लानि यांनीं भरून जातें! पण करणार काय? असें वाटतें कीं त्या समाजाचा पाया उखडीत राहिल्यानें काय हातीं लागणार आहे? पाया मात्र ढिला होईल आणि तसें हातीं कांहींच लागावयाचें नाहीं. असा विचार करून स्वस्थ बसतों झालें!

परंतु ही सर्व आत्मवंचना आहे हें मला कळत नाहीं काय? समाजाच्या शिखरावर बसून मी त्याला खालीं दाबूं शकतों,

बदलूं शकत नाहीं ! त्या समाजवृक्षाला फळाफुलांचा बहर आणावयाचा असेल तर एकच उपाय आहे – त्याच्या मुळांशीं मला स्वतःचेंच सिंचन केलें पाहिजे. अज्ञात राहून सच्चेपणानें वागलें पाहिजे; लबाडी करून कीर्तिमान् होण्यांत काय फायदा आहे ? छेः असली कीर्ति व्यर्थ आहे, नुसती वाळू आहे. आत्मा गमावून साम्राज्य मिळविलें तर त्याचा उपयोग काय ? रत्न गमावून मातीचा ढीग मिळविण्यापेक्षांहि तें जास्त निरर्थक आहे !

जीवनांत एक काय, हजारों गोष्टी आहेत. आणि त्या अंतःकरणांत अशा ठिकाणीं जाऊन बसलेल्या आहेत कीं जागच्या जागीं बोंचत राहतात. त्यांजकडे डोळेझांक करूं म्हटलें तर तेंहि शक्य नाहीं. माझ्या अंतःकरणांत अनुकूल वातावरण सांपडलें म्हणजे कधींकधीं त्या अशा पेट घेतात कीं त्या आगीच्या प्रकाशांत खरा सच्चेपणा काय असतो तें मला स्पष्ट दिसतें. तेव्हां माझी न्यायाधीशाची जागा म्हणजेच एक प्रकारचा शाप आहे आणि वंचनाहि आहे हेंहि स्पष्ट जाणवतें. सत्य लहानाहून लहान होण्यांत, निरिच्छ होण्यांत, बलि होण्यांत सांठविलेलें आहे. आतांपर्यंत पुष्कळ पाहिलें, पुष्कळ वाचलें, परंतु तें सर्व खोटें आहे. खरी गोष्ट एवढीच आहे कीं प्रेमाच्या भाराखालीं नम्र होऊन जो जीवनाच्या मुळाशीं जाऊन पोंचला आहे, तोच धन्य ! जो गर्वानें फुगलेला आहे, तो केवळ जीवनाच्या वरवरच्या बुरशीवर घोंघावत आहे. तो चुकला !

बाकी या व्यर्थ गोष्टी मी कशाला करूं? त्यानें काय फायदा होणार आहे? तसे मनाचे क्लेश कमी तर होतील; परंतु कमी झाल्यानें ते अधिक सह्य होत असले तरी त्यांतील प्रेरणाशक्ति कमी होते हेंहि तितकेंच खरें आहे.

मी असें विचारतों, मानवी जीवनाची गति आंधळी आहे काय? ती अप्रतिरोध्य असेल, परंतु आंधळी आहे असें म्हणायास मी तयार नाहीं. मनुष्य पुढेंपुढें जात असतो आणि थेंबथेंब दुःख त्याच्या अंतःकरणांत सांचत जात असतें. तेंच मानवी जीवनाचें सार आहे. तें सांचलेलें दुःख म्हणजे मनुष्याचा मानसमणि होय. त्याच्याच प्रकाशानें मनुष्याचा गतिपथ प्रकाशित होत असतो. नाहींतर चारहि बाजूस गहन वन आहे, कुठेंहि मार्ग दिसत नाहीं, अशा स्थितींत क्षुधा--तृषा, राग--द्वेष, मान--मोह, इत्यादिकांत गुरफटलेला मनुष्य वेड्यासारखा इकडे तिकडे भटकत फिरत असतो. इकडे जातो, तिकडे जातो; परंतु खरोखर तो कुठेंच जात नाहीं. घाण्याच्या बैलाप्रमाणें एकाच जागीं तो गोलगोल फिरत राहतो!

इतक्या वर्षांच्या आयुष्यांत आतांपर्यंत अनेक लोक मरतांना व जगतांना पाहिल्यानंतर माझी एकच इच्छा राहिली असेल, तर ती ही कीं, माझ्या अंतःकरणांतील व्यथा मला हितकर व्हावी! मला धन नको, मन पाहिजे; धन मलासारखें आहे, मनाची व्यथा अमृतासारखी आहे. सत्याचें निवासस्थान तेथेंच आहे. ती व्यथा आनंदानें पत्करली म्हणजे ज्ञानाची व

सत्याची ज्योत प्रकट होईल. एरव्हीं सर्व ज्ञान ढेंकळासारखें असून सत्याची घोषणा म्हणजे केवळ अहंकार होय.

जें घडत आहे त्याबद्दल दोष कोणास देऊं? विधात्याला तर दोष देऊं शकतच नाहीं, कारण कीं त्याच्या उपकाराबद्दलचे आभारसुद्धां मी तेथपर्यंत पोंचवूं शकलो नाहीं! आणि त्याला तरी दोष कां द्यावयाचा? दोष दिल्याशिवाय राहवतच नसेल तर दुसऱ्या कोणाला कां द्यावा, स्वतःलाच कां देऊं नये? काय असेल तें असो, आमचें दुःख म्हणजे विधात्याचेंहि दुःख होय, असेंच कां समजूं नये? असो; जगाच्या कठोरतेचा बोजा स्वेच्छेनें स्वतःच्या अंगावर घेऊन जे लोक मुकाट्यानें मार्ग आक्रमीत असतात, आणि प्रवास संपल्यावर या धरतीमातेच्या अंकावर मस्तक टेकून स्वस्थचित्तानें झोंप घेतात, त्या लोकांना मी आदरपूर्वक प्रणाम करतों. मी त्यांना एकवेळ दुर्दैवी म्हणेन, पापीसुद्धां म्हणेन, — परंतु मी त्यांना प्रणाम करीन!

आत्याबाईचा जो शेवट झाला त्याबद्दल मी काय सांगूं? त्यावर मी विचारच करूं इच्छित नाहीं! जें झालें तें ठीकच झालें; कारण असें कीं तें आतां कांहीं केलें तरी बदलणें शक्य नाहीं. परंतु एवढें मात्र निश्चित कीं जें प्रेम तिच्याकडून मला मिळालें तें मी कधींहि विसरणें शक्य नाहीं. तें प्रेम इतकें पवित्र आहे कीं त्याच्यापुढें प्रत्यक्ष स्वर्गाचीं द्वारें खुलीं होतील!

छेः पण कांहीं सांगतां येत नाहीं! स्वर्ग काय, नरक काय, मला कांहींच समजत नाहीं; विधात्याची लीला मला समजत

नाहीं. मला इतकेंच समजतें कीं मी हृदयहीन होऊं शकलों नसतों तर आज नामांकित वकील होऊन न्यायाधीशाच्या खुर्चीवर बसण्याचें भाग्य मला लाभलें नसतें !

त्यादिवशीं आत्याबाई आपल्या नवऱ्याबरोबर गेली. त्यानंतर पुष्कळ दिवस मला भेटली नाहीं. कालांतरानें मी मॅट्रिक झालों, कॉलेजमध्ये गेलों आणि दोन वर्षांनीं इंटरची परीक्षा पास झालों. नवी परिस्थिति प्राप्त झाली, नवे मित्र मिळाले; दृष्टि अधिक विस्तृत होत गेली आणि आयुष्यांतील आकांक्षा डोळ्यासमोर स्पष्ट उभ्या राहिल्या. आत्याबाईची आठवण हळुहळू पुसट होत गेली. आधीं आधीं मी एकसारखा आईबाबांना तिच्याबद्दलची बातमी विचारीत असे. त्यांचेकडूनहि ‘ बरें चाललें आहे ’, ‘ आनंदांत आहे ’ यापलिकडे कांहींच कळत नसे. मी मनांत म्हणें, हें बरें चालणें, आनंदांत असणें, ही काय चीज असते ? खरोखर आत्याबाई आनंदांत आहे काय ? ती आनंदांत असली तर येथें माझ्या जीवाला चैन कां नाहीं ? असे विचार मनांत उत्पन्न होत आणि लागलीच नाहींसे होत असत. बरेच दिवसांनीं असें कळलें कीं तिला एक मुलगी झाली, परंतु ती मेलेलीच जन्मली. तिला जन्म देतांना आत्याबाईची स्थितीहि मृतप्रायच झाली होती. परंतु ‘ जया देव तारी ’ त्याला मरण येणें कठीणच ! देवाच्या दयेनें ती वांचली. दयेनें म्हणतांना जीभ जरा अडखळते, परंतु कांहीं झालें तरी ती निर्दयता तर म्हणतां येत नाहीं ?

एक दिवस असें झालें, कीं मी आईला विचारलें, “ आई,

आत्याबाईकडून कांहीं पत्रबित्र आलं आहे का? या खेपेस सुटींत मी तिच्याकडे जाणार आहे."

हें ऐकून आई रागानें डोळे फाडून माझ्याकडे पाहूं लागली. बोलली मात्र नाहीं.

मी पुन्हां काकुळतीनें विचारलें, "आई सांग ना—कांहीं तिचं पत्रबित्र आलं नाहीं का?"

आईनें कांहीं विलक्षण बेपर्वाईनें उत्तर दिलें, "नाहीं."

मी म्हटलें, "आलं आहे!"

"अरे बाबा, नाहीं आलं, नाहीं आलं! कां उगाच माझा जीव खातोस?"

मी म्हटलें, "काय झालंय् तरी काय? मला कां सांगत नाहींस?"

"काय व्हायचंय्? सांगितलं ना एकदां कांहीं झालं नाहीं म्हणून? ती काय, असेल आनंदांत अन् काय? आणि तुला कां रे पंचाईत? आपलं लिहिणं वाचणं कांहीं नाहीं, उठल्या-सुटल्या 'आत्याबाई, आत्याबाई!' आहे तरी काय? जा, तुझी आत्याबाई मेली!—नाहीं तर काय? पुन्हां तिच्याबद्दल तोंडांतून शब्द तर काढ—"

मी बघतच राहिलों. म्हटलें "आई, आहे तरी काय?"

"कांहीं नाहीं! जा मुकाट्यानें आपला अभ्यास करीत बस."

कांहीं केल्या आईकडून कांहीं मला बातमी लागली नाहीं. ती मुळीं कांहीं बोलायलाच तयार नव्हती. मग एकदां बाबांना

विचारलें. तेहि गप्पच बसले. तें पाहून मी म्हटलें, " बाबा, खरं सांगा, आत्याबाई मेली ? "

बाबांनीं रागावून माझ्याकडे पाहिलें व म्हटलें, " कुणी सांगितलं ? "

" सांगितलं कुणी तरी ! तुम्ही मला खरं सांगा—मेली का ती ? "

" छे: रे ! "

" मग काय झालंय् तिचं ? "

" काय व्हायचंय् ? कांहीं नाहीं झालं ! "

असे कित्येक दिवस गेले. परंतु मला तें कोडें उलगडलं नाहीं. त्या दिवसापासून आत्याबाईबद्दल घरांत बोलणें निघेनासें झालें. तिचें नांव घेतल्याबरोबर सगळीं गप्प बसत. बाबांच्या स्वभावांत बदल झालेला दिसला. दिवसेंदिवस ते अधिकाधिक गंभीर होत चालले होते आणि आई चिरचिरी होत चालली होती.

पुष्कळ दिवसानंतर मला अशी बातमी लागली कीं आत्याबाईला तिच्या नवऱ्यानें टाकून दिलें आहे — जणूं कांहीं आत्याबाई वाईट चालीची असून ती पहिल्यापासूनच तशी आहे हें तिच्या नवऱ्याला माहीत होतें ! ' टाकून दिलें ' याचा अर्थ काय हें एकदम लक्षांत आलें नाहीं. कुठें टाकून दिलें ? ती स्वतः कुठें तरी निघून गेली, कीं तिला दुसरीकडे कुठें ठेवलें आहे, कीं त्याच घरांत राहून तिच्याशीं नवऱ्यानें संबंध

सोडला आहे? शेवटीं अशी बातमी लागली कीं त्याच गांवांत तिला दुसऱ्या एका घरांत ठेवलें आहे; घर म्हणजे एक लहानशी खोलीच आहे; तेथें तिनें मनास येईल तसें रहावें, मनास येईल तसें खावेंप्यावें! अरे पण रहाणार कशी अन् खाणार पिणार कशी? — कांहीं कां करीना, वाटेल तशी राहील अन् खाईल पिईल! आणखी असें ऐकलें कीं तिच्या नवऱ्यानें तिला माहेरीं जाऊन रहावयास सांगितलें, परंतु तसें करण्यास ती मुळींच तयार नव्हती. त्यानें तिला धाकदपटशा दाखविला, मारलें, परंतु ती मरायला तयार झाली पण आमच्याकडे यावयास कबूल झाली नाहीं. तेव्हां तिच्या नवऱ्यानें स्वतः जाऊन तिला दुसऱ्या एका ठिकाणीं नेऊन ठेविलें होतें.

हें सर्व मीं एखाद्या कल्पित कथेप्रमाणें ऐकून घेतलें. आधीं आधीं माझें मन त्या गोष्टीकडे मोठ्या उत्साहानें धांव घेत होतें. नंतर हळुहळू तो उत्साह मावळत गेला. मनानें त्या गोष्टीचा स्वीकार केला आणि जीवनप्रवाह पूर्ववत् चालू झाला!

जीवन आहे, आपलें चालूच आहे! कोण कोणाकरितां थांबलें आहे? मरणारे मरताहेत, परंतु जगणारे मेलेल्यांचीं प्रेतें कवटाळून आपली वेळ येण्यापूर्वीं तर मरूं शकत नाहींत? पडणाऱ्याबरोबर कोणी पडतो काय? हीच तर मौज आहे. पडणारा पडतो; त्याला उठविण्याच्या भरीस तुम्ही पडलांत कीं तुम्ही आदळलांत! म्हणून आपले पुढें चला! अस्तु.

असाच पुढें चालत असतांना एकाएकीं मला एक गोष्ट कळली. ती अशी कीं आत्याबाई पूर्वींच्या ठिकाणीं नसून दुसऱ्या गांवीं निघून गेली आहे, आणि तिच्याबरोबर कोणी एक कोळशाचा व्यापारी आहे. आमच्या गांवापासून तें गांव विशेष दूर नव्हतें. त्या गांवच्या एका कोंपऱ्यांत कुठें तरी आत्याबाई येऊन पडली असेल ही गोष्ट अत्यंत आश्चर्यजनक आणि कांहींशी असंभाव्य वाटली !

यानंतर कांहीं दिवसांनीं बाबा वारले. आतां आम्हीं जरा जास्त काटकसरीनें राहूं लागलों. आई मोठी विचारी बाई होती. उगाच पोकळ मोठेपणा मिरवणें तिला आवडत नसे. माझ्या-बद्दल ती उच्च आकांक्षा बाळगीत होती. या दरम्यान मी इंटरची परीक्षा पास होऊन बी. ए. च्या वर्गांत शिकत होतों. कॉलेज उघडण्याच्या सुमारास जावयास निघालों तेव्हां रस्त्यांत त्याच गांवचें स्टेशन लागलें, आणि मनांत नानातऱ्हेचे विचार उत्पन्न झाले. मनाशीं ठरविलें कीं आतां नाहीं, परंतु परत येतांना मात्र अवश्य येथें उतरणार; आत्याबाईला शोधून काढणार, आणि म्हणणार, ‘आत्याबाई, तूं इथं? काय ही तुझी अवस्था? चल इथून, आतांच्या आतां चल !’

कॉलेजला सुटी झाल्याबरोबर घरीं निघून येण्याबद्दल आईनें लिहिलें होतें. असें झालें होतें कीं माझ्या लग्नाबद्दल बोलणीं केव्हांच सुरू झालीं होतीं आणि तें सूत्र हातीं घेऊन याखेपेस त्याची पक्की गांठ मारण्याची आईची इच्छा होती. परंतु परत येतांना रस्त्यांत त्या स्टेशनवर उतरल्याशिवाय माझ्यानें राहवलें नाहीं आणि मी आत्याबाईचा पत्ता काढलाच !

———



शहराच्या त्या भागांतून जातांना माझें मन कचरत होतें. कोठें आत्याबाई, आणि कोठें ही घाणेरडी वस्ती ! सगळी वस्ती खालच्या वर्गाच्या लोकांची होती. एका लहानशा गल्लींत अगदीं आंतल्या बाजूला आत्याबाईची जागा होती. बाहेरच्या बाजूला त्या कोळशाच्या व्यापाऱ्याचें दुकान होतें. मी तिच्या खोलीसमोर येऊन जरासा थबकलों. परंतु धीर करून, दार लोटून आंत गेलों.

आत्याबाईच होती ती ! तीच का ? हो, शंकाच नको. एक जुनेरें नेसून शेगडीवर ती भाकरी भाजीत बसली होती.

कोणाची तरी चाहूल लागतांच तिनें डोक्यावरून पदर थोडासा पुढें सरकविला. परंतु मला पाहिल्याबरोबर थोडावेळ आश्चर्यानें बघतच राहिली. ओळखलें कीं नाहीं हिनें ? मीहि तिच्यासमोर स्तब्ध उभा राहिलों. तिच्या दृष्टीमध्यें असा कांहीं

विलक्षण भाव मला दिसला कीं आपण कोठून येथें आलों असें मला झालें !

कांहीं वेळानें तिनें माझ्यावरची दृष्टि काढून मुकाट्यानें समोरच्या शेगडीकडे लाविली आणि पुन्हां ती आपल्या कामाला लागली.

होती आत्याबाईच ती; पण हें काय तिचें रूप ? शरीर पार सुकून गेलें असून चेहरा अगदीं फिक्कट झाला होता. गर्भारशी दिसली. एक विटक्या लुगड्यानें आपला देह झांकून बसली होती. मुखावर लज्जा व दुःख यांची कृष्णछाया पसरली होती. खोलीची लांबीरुंदी बारा चौरस फुटांपेक्षां जास्त नसेल. बाहेरच्या बाजूला पडवीसारखी मोकळी जागा असून तेथें धोतरें, लुगडीं वगैरे वाळत घातलीं होतीं. खोलींत एका बाजूला कपड्यांची रास रचून ठेविली होती. जवळच एकदोन ट्रंका होत्या. वरच्या बाजूला दांडीवर तेथल्यातेथेंच लागणारे कांहीं कपडे टांगलेले होते. आत्याबाईच्या पाठीमागच्या बाजूला एकदोन पत्र्याचे डबे, दोन चार घागरी—कळशा, आणि कांहीं मडकीं वगैरे ठेवलेलीं होतीं. जवळच कांहीं पितळेचीं व ॲल्युमिनियमचीं भांडीं असून एक बादली आणि एक पाण्याचा माठ भरून ठेवलेला होता. एका कोपऱ्यांत कोळशाचें अर्धवट दुमडलेलें पोतें पडलें होतें—

मी हें सर्व बघतच राहिलों. आत्याबाई एक अक्षरहि बोलली नाहीं ! तिनें पहिल्यापासून शेगडीवर जी दृष्टि खिळवून ठेविली होती ती तेथून काढली नाहीं.

कांहीं वेळानें मी म्हटलें, " मी – प्रमोद – आलों आहें आत्याबाई ! "

उत्तर नाहीं !

मीहि थोडा वेळ गप्प बसलों. मग म्हणालों, " मी जाऊं ? "

तरी तिनें डोळे वर करून माझ्याकडे पाहिलें नाहीं, कीं एक अक्षर तोंडावाटे काढलें नाहीं.

परंतु माझें तेथून पाऊल निघेना—जणूं कांहीं पाय जमिनीला खिळले होते ! मी बळेंच जरा हसून म्हटलें, " बरं, नाहीं जात ! पण कांहीं बसायला देशील कीं नाहीं आत्याबाई ? "

माझी कल्पना होती कीं आतां तरी आत्याबाई बोलेल, पण एक नाहीं अन् दोन नाहीं ! इतक्यांत बाहेर कोणाचीं तरी पावलें वाजलीं आणि आवाज आला, " झालं का जेवायचं ? " आणि लागलीच पाठीमागून एक व्यक्ति आंत आली. मला पाहिल्या-बरोबर तो गृहस्थ आश्चर्यानें स्तब्ध उभा राहिला.

आत्याबाई शेगडीकडेच पहातपहात म्हणाली, " ऐकलं कां ? हे इथं कशाला आले आहेत ? त्यांना म्हणावं जा इथून ! "

तो गृहस्थ अधिक आश्चर्यचकित होऊन वरपासून खालपर्यंत मला न्याहाळीत उभा राहिला. त्यावेळीं माझ्या ध्यानांत आलें कीं येथें येतांना सूटबूट, नेकटाय्, हॅट घालून येऊं नये हें मला कसें सुचलें नाहीं ? त्यावेळीं अंगावरचे कपडे मला बोचूं लागले ! तो गृहस्थ कांहींसा चमकून माझ्याकडे पहात उभा राहिला आणि कांहीं बोलूं शकला नाहीं.

मी म्हटलें, " आत्याबाई मी खरंच जाऊं ? "

तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं !

मी पुन्हां म्हटलें, " बरं तर, मी जातों, पण कालपासून मला कांहीं खायला मिळालं नाहीं – मला भूक लागली आहे, खरं सांगतों ! "

एवढें बोलून मी जाऊं लागलों—

आत्याबाई कोणाकडे न पहातां म्हणाली—

" ऐकायला येत नाहीं का ? उभे काय राहिलां आहां, जाऊन चार पैशाचं दही आणा ! आणि हें पहा, साखरहि संपली आहे—"

तो गृहस्थ झटकन् खोलींतून बाहेर पडला.

मी बुटाचे बंद सोडले आणि सहज एका बाजूस रचून ठेवलेल्या कपड्यांच्या राशीवर जाऊन बसलों. आतां मी आत्याबाईच्या अगदीं समोर होतों. मी म्हटलें, " आत्याबाई, खरं सांगतों मी कालपासून उपाशी आहे बरं ! "

आत्याबाईनें डोळे वर करून माझ्याकडे पाहिलें ! त्या डोळ्यांत काय होतें ? ती म्हणाली, " तुम्हांला आमच्या इथलं चालेल ? "

मी म्हटलें, " 'तुम्ही' ? बरं आहे, तसं कां होईना ! मला भूक लागली आहे. मी कुणाकडचंहि खाईन ! "

आत्याबाईनें खालीं मान घातली. शेगडीवरून तवा उतरून ती तव्यावरची भाकरी निखाऱ्यांवर भाजूं लागली. भाकरी

चांगली भाजली. तिनें ती उरपतली. परंतु ती बोलली नाहीं. भाकरी भाजून झाल्यावर बाजूला ठेविली. पुन्हां तवा शेगडीवर ठेविला. आणि नंतर—

मी पाहिलें कीं तिची दृष्टि कांहीं केल्या वर होतच नव्हती! माझ्या मनाला अत्यंत कष्ट होत होते. मनांत येत होतें कीं तिला एकदां नीट पटवावें कीं मी प्रमोद आहे प्रमोद; आत्या-बाई,–ऐक तर, पहा तरी जरा–मी तोच तुझा प्रमोद आहे–आणि तूंहि तीच माझी आत्याबाई आहेस – काय नाहीं का?

मी म्हटलें, " आत्याबाई—"

तिनें नुसतें ऐकून घेतलें.

मी म्हटलें, " बाबा गेले आत्याबाई–तुझी आठवण काढीत गेले! सांग, आतां मला कोण आहे? एक आई, दुसरी तूं–"

ती शून्य दृष्टीनें कुठेंतरी पहात राहिली. कांहीं बोलली नाहीं. मला असें झालें कीं तिच्यापुढें हृदय फाडून उघडें करून दाखवावें म्हणजे तरी ती कांहीं बोलेल! कां अशी मला निष्कारण छळतेय्!

मी म्हणालों, " मी बी. ए. च्या वर्गांत आहे बरं आत्या-बाई! आतां कॉलेजहूनच सुटींत इकडे येत आहे. आई माझ्या लग्नाच्या गोष्टी करीत आहे. ऐकतेस ना? आईच्या मनांत यंदाच लग्न उरकून घ्यायचं आहे! पण माझी इच्छा नाहीं. बी. ए. पास होईपर्यंत मी या गोष्टीचा विचारच करणार नाहीं. बरोबर आहे ना, आत्याबाई? तूं बोलली नाहींस तरी चालेल,

पण मी तुला सांगून ठेवतों कीं इतक्यांत मला लग्न करायचं नाहीं ! परंतु तिथं माझ्यातर्फे आईला सांगायला कोणीच नाहीं. ती तर मला बोलूनच देत नाहीं. आत्याबाई, माझ्यावर जर कांहीं जुलूम जबरदस्ती झाली तर—तर सांगून ठेवतों मी तुला दोष देईन, मला दुसरं तिसरं कांहीं माहीत नाहीं ! ”

मी पाहिलें आत्याबाईचे हात शिथिल, निष्क्रिय झाले होते. तव्यावरची भाकरी जळण्याची सूचना देऊं लागली होती—

इतक्यांत कुणीसें दार ठोंठावलें. आत्याबाई चमकून शुद्धी-वर आली आणि हातांतील भाकरी पुन्हां व्यवस्थितपणें थापटूं लागली. त्या गृहस्थानें आंत येऊन दही व साखर तिच्या-समोर ठेविलीं.

आत्याबाई म्हणाली, “ आतां जाऊन दुकानावर बसा, ऐकलं ? जेवायला थोडा अवकाश आहे – जराशानें या. ”

तो गृहस्थ हें ऐकून माझ्याकडे पहात बाहेर निघून गेला.

मग आत्याबाईनें दृष्टि वर करून माझ्याकडे पाहिलें आणि म्हटलें, “ चला, या—”

मी म्हणालों, “ तुझं होऊं दे ना – मग तुझ्याबरोबरच बसेन—”

ती आग्रहानें म्हणाली, “ नाहीं – नाहीं, तुम्हीं बसा—”

मी म्हटलें, “ माझ्याबरोबर तूं नाहीं बसणार ? ”

“ नाहीं. ”

“ मग केव्हां जेवशील ? ”

" मागाहून बसेन. "

मी म्हटलें, " मागाहून केव्हां ? आतांच बस ना ! "

" त्यांचं झालं म्हणजे मी जेवीन. "

मी बोललों नाहीं. मुकाट्यानें उठलों, पायमोजे काढले, कोट काढून दांडीवर टाकला, आणि जवळचें एक ताट उचललें. ताट घेऊन विचार करूं लागलों, कुठें आणि कसें बसावें ?

" तिथली एक चटई घ्या ना ! आणि इथं जवळ आंथरून बसा. "

मी चटई घेऊन तिच्याजवळ बसलों. जेवतां जेवतां आत्याबाईनें विचारलें—

" आई बरी आहे ? "

" बरी आहे. "

" इथं कुठं उतरलां आहां ? "

" स्टेशनवर वेटिंग—रूममध्यें सामान टाकलंय्. "

" कालच आलांत ? "

" हो – कालच. "

" इथला पत्ता कसा कळला ? "

" कळला कसा तरी ! "

" जाणार केव्हां ? "

" तूं येशील तेव्हां ! "

हें ऐकल्याबरोबर विजेचा धक्का बसल्याप्रमाणें तिचा चेहरा फिका पडला ! रक्त गोठून जावें तसें झालें. ती खालीं पाहूं

लागली आणि कांहीं बोलली नाहीं. मीहि गप्पच राहिलों. थोड्या वेळानें मी म्हटलें, " का येणार नाहींस ? "

यावेळीं मात्र अत्यंत कठोर आणि स्थिरावलेल्या दृष्टीनें मजकडे पहात तिनें विचारलें, " कुठं ? "

" कुठं काय – घरीं ! "

त्याच दृष्टीनें माझ्याकडे पहात ती म्हणाली, " आईनें बोलावलं आहे ? "

" मी बोलावतोय् ना पण ? "

हें ऐकून तिला जरा धीर आला. चेहऱ्यावरची कठोरता पण जरा कमी झाली. म्हणाली, " आधीं लग्न तर करा, मग घर होईल; आणि नंतर बोलवायला आलात म्हणजे पाहूं—"

मी जोरानें म्हटलें, " सध्यांचं घर माझं नाहीं तर कुणाचं आहे ? "

कांहीं उत्तर न देतां ती शांतपणें माझ्याकडे पहात राहिली.

मी विचारलें, " मग, नाहीं का येणार ? "

यावर ती किंचित् हंसून म्हणाली, " तुम्हीं सांगतां मी बी. ए. च्या वर्गांत आहे; पण मी पहातें, तुम्हीं अजून कांहींच शिकलां नाहींत ! "

मी म्हटलें, " नाहीं शिकलों तर नाहीं, पण मी तुला घेऊन जाणार ! "

ती म्हणाली, " बरं, आधीं जेवून तर घ्या, मग काय करायचं असेल तें करा. "

मी म्हटलें, " तुला माहीत आहे, मी आतां वीस वर्षांचा झालों आहे. कायद्याप्रमाणें सज्ञान आहे. घराचा मालक मी आहें. आई असली तरी माझी आई आहे ! मी तुला इथं कसा राहूं देईन ? "

तिनें म्हटलें, " मग काय, तूं मला घेऊन जाणारच तर ? "

" अवश्य घेऊन जाणार ! "

ती क्षणभर थांबली. नंतर म्हणाली—

" घेऊन जाणारच, तर मग ऐक ! मी येणार नाहीं — येऊं शकत नाहीं ! तुम्हीं मला नीट ओळखलं नाहीं. मी नवऱ्याचं घर सोडून इथं आलें आहें. नवरा आहे, परंतु परपुरुषाच्या आश्रयाला येऊन राहिलें आहें, त्याच्याबरोबर रहात आहें. तुम्हांला तें कळणार नाहीं. तुम्हीं आपले डोळे खुशाल झांकून बसा, पण मला आपलं हें सर्व पातक गिळून टाकायला तुम्हीं सांगूं शकत नाहीं ! शिवाय नवऱ्याचं घर सोडून येतांना ज्यांची मला सोबत झाली, त्यांना मी सोडून देऊं ? त्यांनीं माझ्याकरितां काय त्याग करायचा शिल्लक ठेवला आहे ? त्यांच्या दयेमुळें मी वाचलें. मी मरूं शकलें असतें, पण नाहीं मेलें. आत्महत्या करणें हा अधर्म आहे हें जाणून मी मरण पत्करलें नाहीं. आत्महत्त्येच्या अधर्मापासून मी बचावलें तें कोणाच्या आश्रयानें ? ज्यांच्या आश्रयानें मी वाचलें त्यांना सोडून द्यायला मला सांगतां ? तें शक्य नाहीं. मी पापिणी असेन; त्याबरोबर आणखी कृतघ्नहि होऊं कीं काय ? प्रमोद,

तुम्हीं सर्व मंडळी मी मेलें असेंच कां समजून चालत नाहीं ? कां उगाच मला छळतां ? "

मी ऐकतच राहिलों. अशा गोष्टी आत्याबाईच्या तोंडून मी पूर्वी कधींच ऐकल्या नव्हत्या. असें वाटलें कीं, तिच्या या जीवनामध्यें कांहीं विलक्षण आंतरिक शक्ती भरली असली पाहिजे; एरव्हीं शरीरानें ती जवळ जवळ अर्धमेलीच झाल्या-सारखी तर आहे !

माझें जेवण झालें. आत्याबाईचाहि स्वैंपाक झाला होता. लागलीच कांहीं मोजकीं भांडीं तिनें घासलीं पुसलीं आणि मला म्हणाली—

" हें पहा, अगदीं आतांच जायला निघालां नाहीं ना ? "

" आत्तांच नाहीं जात— "

" तर मग एक काम करा. बाहेरच्या बाजूला दुकान आहे, तेथून ह्यांना जेवायला पाठवून द्या. तेवढीं पांच मिनिटें तुम्हीं तिथं बसा. मग जरा विश्रांति घेऊन, जायचं असेल तर संध्याकाळीं जा. "

मी बाहेर येऊन त्या गृहस्थाला जेवायला जाण्यास सांगितलें, आणि त्या कोळशाच्या दुकानांत कुठें बसावें याचा विचार करूं लागलों. एक बैठक होती, तिच्यावर कोळशाची भुकी पसरली होती. तिथें मला बसावेसें वाटेना. दुकानाच्या बाहेरच मी इकडेतिकडे येरझारा घालूं लागलों.

ती गल्ली विचित्र होती. तिथें दिवस क्वचितच होत असेल! दिवसाढवळ्या रात्र भासत होती, रात्रीं काय होत असेल कुणास ठाऊक! अगदीं एकाला एक लागून असलेल्या खोल्यांची रांगच्या रांग होती. त्या खोल्या म्हणजे दुकानेंच होतीं व रात्रीं तीच त्यांचीं स्वप्नसृष्टी होती. कांहीं दुकानांत हलक्या प्रकारच्या वस्तु विकायला ठेवलेल्या होत्या तर कांहीं ठिकाणीं शिळी भाजी व नासकींकुजकीं फळें होतीं. कुठें एखादें न्हाव्याचें दुकान होतें, तर कुठें अमेरिकन फयाशनचे कपडे शिवून देणारा एखादा शिंपी हातानें कपडे शिवीत बसलेला होता. तेथें आकाशाचीहि गल्ली झाली होती आणि कालाची गणना रात्रीच्या हिशेबानें होत असली पाहिजे.

बी. ए. च्या वर्गांत शिकणारा मी; पँटवर फक्त एक शर्ट आणि शर्टवर फक्त नेकटाय् घालून त्या दुकानासमोर येरझारा घालीत असतांना — आत्याबाईच्या व तिच्या भोंवतालच्या विचित्र परिस्थितीसंबंधानें मुद्दाम कांहीं विचार न करतां माझ्या मनांत काय काय विचार येऊन गेले ते माझें मला माहीत!

इतक्यांत त्या गृहस्थानें येऊन सांगितलें, " ती तुम्हांला घरांत बोलावीत आहे. "

मी जाऊं लागलों, त्यासरशी एकदम माझा हात धरून मला थांबवीत तो म्हणाला, " एक मिनिट जरा — "

असें म्हणून मला तिथेंच सोडून झटकन् तो निघून गेला व क्षणार्धांत् परत आला. येतांना हातांत कागदांत गुंडाळलेला

एक विडा घेऊन आला. तो माझ्यापुढें करीत म्हणाला, " घ्या ना – "

मी मुकाट्यानें विडा घेतला.

" तंबाखू ? "

" छे: छे: मला आणखी कांहीं नको. "

मला संकोच वाटत आहे अशी त्याची कल्पना झाली असावी. त्यानें आपल्या बंडीच्या खिशांत हात घालून एक छोटीशी डबी बाहेर काढली आणि ती माझ्यापुढें करून म्हटलें, " अस्सल बनारसी तंबाखू आहे दादा ! "

मी घुटमळत म्हणालों, " छे: छे: – मी – "

" × × रुपये शेराची आहे दादा, अगदीं अस्सल बनारसहून आणवलेली — "

त्यानें किती रुपये शेराची आहे म्हणून सांगितलें तें माझ्या नक्की लक्षांत नाहीं ! खरोखर त्याची तंबाखू चांगली असेलहि. तिचा अव्हेर करण्याची पाळी आल्यामुळें मला जराशी लाज वाटली. मी म्हटलें –" नको, मी – "

माझी असमर्थता पाहून सदय भावानें तो हसला–हें हें हें हें !

मी घरांत गेलों. तेथें पाहिलें तो कपड्यांचा ढीग बाजूला केलेला असून तेथेंच सतरंजीवर जरा मऊ लागण्यासाठीं थोडे कपडे घालून वर एक नवीन पलंगपोस अंथरण्यांत आत्याबाई गुंतली होती. मला पाहिल्याबरोबर ती म्हणाली —

" तुम्ही आतां जरा पडा. "

मी विचारलें " तूं जेवलीस ? "

" बसतेंच आतां. "

" मग तूं जेवून घे. "

" मी जेवतें, तुम्ही जरा बसा तर खरे ! "

मी बसलों. तिनें जवळच्या दोन उशा माझ्याकडे फेंकल्या आणि म्हटलें, " पडा ना. "

" पडतों--पडतों. "

नंतर तिनें एक उष्टें ताट घासावयास सुरवात केली आणि घासून झाल्यावर त्याच ताटांत आपलें जेवण वाढून घेतलें. माझी दृष्टि आपल्याकडे लागून राहिलेली आहे असें पाहून ती म्हणाली, " या आतां मला सोबत बसायला. "

मी म्हटलें, " तूं कुठं मला सोबत बसली होतीस ? "

" म्हणून तुम्ही नाहीं कां मला सोबत बसणार ? "

" मी बघितलं आत्याबाई – तुला नाहीं तरी माझी सोबत नकोच आहे. "

" तुमची सोबत घ्यायला मला तोंड कुठं आहे ? " एवढें बोलून ताट उचलून ती एका कोंपऱ्यांत जाऊन बसली.

जेवण झाल्याबरोबर लागलीच तिनें भांडीं घासायला सुरवात केली. मी म्हटलें, " हें काम जराशानें केलं तर नाहीं का चालायचं ? "

ती म्हणाली, " झालंच आतां दोन मिनिटांत. "

मी तेथून दृष्टि काढून, उशी डोक्याखालीं घेऊन एका

कुशीवर पडलों. त्यावेळीं उद्यां उगवणारा आपला दिवस आजच्यापेक्षां कांहींतरी निराळा असणार आहे ही गोष्टच मी विसरलों होतों. कोणास ठाऊक कसा असेल ? कांहीं वेळानंतर या परिस्थितीचे पाश आपल्याला तोडावे लागणार आहेत हें माझ्या लक्षांतच राहिलें नाहीं. असें वाटूं लागलें का मी इथलाच आहें, इथेंच कायमचा राहणार आहें आणि इथल्या-पेक्षां जिव्हाळ्याची दुसरी जागाच नाहीं ! कुठें माझें कॉलेज, कुठें माझ्या लग्नाच्या गोष्टी, कुठें मी आणि कुठें माझ्या आयु-ष्याच्या आकांक्षा ? कुठें काय राहिलें होतें ? कांहीं ध्यानींमनींहि नाहीं ! अनिवार्य भविष्यकालाचा विसर पडला होता. आज जें आहे तेंच खरें, त्याव्यतिरिक्त कांहीं नाहीं ! तेंहि कालाच्या आधीन आहे हें ज्ञानहि त्यावेळीं राहिलें नाहीं. कांहीं चर्चा, कांहीं प्रश्नोत्तरें, यांनीं भरून काढण्यासारखें आमच्या दोघांच्या परिस्थितींत कांहीं अंतर राहिलें आहे असें माझ्या मनांतहि आलें नाहीं. जणूं कांहीं सर्व ठीक आहे आणि आम्हीं दोघे या क्षणाला या स्थितींत आहोंत यांत विशेष कांहींच नाहीं !

या तंद्रींत ऐकलें—" झोंप लागली ? "

कुशीवरून वळून पाहिलें—आत्याबाई माझ्या अंथरुणाजवळ जमिनीवर बसली होती आणि विचारीत होती, " झोंप लागली होती का ? "

" छेः मुळींच नाहीं. "

" नसेल आली तर जरा झोंपा आतां. "

" तुला कांहीं आणखी काम आहे का ? "

" काम — ? "

" आणखी काम नसेल तर — "

" काम तसं पुष्कळ आहे. पण तें पाहतां येईल. बरं तुम्ही—"

" आत्याबाई, तूं इथं बैस. आज काम राहूं दे. "

" काम ठेवलंच आहे बाजूला आणि इथं बसलें तर आहे ! "

माझ्या मनांत त्यावेळीं किती तरी प्रश्न घोळत होते. आज आत्याबाईची जी स्थिती आहे त्या स्थितीबद्दल ती जबाबदार नाहीं, हें मनाला पूर्णपणें पटेना. परंतु या अवस्थेंतहि तिच्या सर्व बोलण्याचालण्यांत इतकी स्वाभाविकता होती कीं मला आपल्या अहंभावाच्या भरांत तिची दया यावी हें अशक्य होतें. मग करूं काय ? मी विवश होऊन म्हटलें—

" आत्याबाई — "

ती म्हणाली, " बोला ना--थांबलांत कां ? "

मी अडखळत म्हणालों, " मला तर कांहीं समजेनासं झालंय् ! ही जागा मला कांहीं बरी वाटत नाहीं -- "

" जागा चांगली म्हणतो कोण ? पण जागा तर आहे ? कधीं कधीं टीचभर जागा मिळणें ही सुद्धां महत्त्वाची गोष्ट असते. तुम्हांला काय समजत नाहीं तें स्पष्ट सांगा ना -- " असें म्हणून ती कांहीं विलक्षण दृष्टीनें मजकडे पाहूं लागली. ती दृष्टि मला बरी नाहीं वाटली.

मी म्हटलें -- " तूं इथंच राहणार आहेस काय ? याच ठिकाणीं ? किती दिवस राहणार आहेस ? "

" सध्यां तर इथंच आहे. या खोलींत मी राहिलें नाहीं तर दुसरें कोणी तरी राहील. इथं राहण्यालायक माणसें थोडीं का आहेत ? पुढं काय होणार आहे मला सांगतां येत नाहीं. पण फार दिवस मात्र इथं राहूं शकणार नाहीं असं वाटतं. "

" कुठं जाणार आहेस ? "

" कुणास ठाऊक ! "

" कां जाणार ? "

ती किंचित् हंसून म्हणाली--

" ज्या या माणसाबरोबर मी रहात आहे तो मला फार दिवस ठेवूं शकेल असं तुम्हांला वाटतं ? मुळींच नाहीं. एक दिवस तो मला सोडून निघून जाईल हें मी ओळखून आहे. त्या दिवशीं मलाहि ही जागा सोडून जावें लागेल. "

तिच्या बोलण्यांत असा कांहीं विलक्षण स्थिर भाव आणि उदासीनता होती कीं मी चीतच झालों ! विचारलें—" मग काय करणार आहेस ? "

" काय करणार आहे हें आज मी काय सांगूं ? कितीहि विचार केला तरी तें आज थोडेंच सांगतां येणार आहे ? एक गोष्ट मात्र सांगूं शकेन -- "

बोलतां बोलतां मध्येंच थांबून तिनें माझ्यावर आपली दृष्टि खिळविली. मी भीतभीत विचारलें, " काय ? "

" वेश्यावृत्ति कधीं करणार नाहीं— याची खात्री बाळगा."

हें ऐकून मी जरासा चपापलों.

ती पुढें म्हणाली—

" ज्याला आपलं शरीर द्यायचं त्याच्याजवळून पैसे घ्यायचे ही कल्पनाच मला सहन होत नाहीं. शरीराचं दान करण्याची आवश्यकता मला समजते. मी तें दान करूं शकेन. कदाचित् तें अनिवार्यहि असेल. पण त्याबद्दल मोबदला घेणें--छेः ! दान हा स्त्रीचा धर्म आहे. याशिवाय तिचा दुसरा धर्मच कोणता ? तिचं मन मागितलं, दिलं पाहिजे; शरीर मागितलं, दिलं पाहिजे. सतीचा आदर्श हाच नाहीं का ? पण त्याचा विक्रय ? छे: छे: तें शक्य नाहीं ! "

हे शब्द ती मला उद्देशून बोलत नसून आपल्याच कल्पनांना आपणच उत्तर देऊन निरूत्तर करूं पहात होती, असें मला भासलें. मी म्हटलें—

"आत्याबाई, रागावूं नको हं-मी तुला असं विचारतों कीं अशी पाळी तुझ्यावर यावीच कां ? तूं नवऱ्याला सोडून कां आलीस ?"

माझ्यावर दृष्टि स्थिरावून ती म्हणाली —

" तुमच्यावर मी रागावेन हें कसं शक्य आहे ? मी नवऱ्याला सोडलं नाहीं; त्यांनच मला सोडलं. स्त्रियांचा धर्म म्हणजे पतिव्रताधर्म असंच मी समजतें. यापरता त्यांना दुसरा धर्म नाहीं. पतीचं आपणावर प्रेम नसतांना आपला भार त्याच्यावर टाकीत राहणं हें पतिव्रतेला आवडेल काय ? त्यांना मी तोंडासमोर

नको होतें, हें ओळखून त्यांच्या दृष्टीसमोरून निघून जाणें हा मार्ग मी पत्करला. ते म्हणाले ' मी तुझा नवरा नाहीं. ' तेव्हां आपला भार त्यांच्यावर टाकण्याचा मला काय अधिकार होता? हा पतिव्रतेचा धर्म नव्हे--"

" आत्याबाई, आत्याबाई --- हें काय तूं बोलतेस ? हें असं कां झालं ? "

" कां झालं तेंच तुम्हांला सांगतें. लग्न झाल्यानंतर मी पुष्कळ पुष्कळ विचार केला. विचारांतीं असं वाटलं कीं ही फसवणूक यापुढें चालू ठेवणं बरं नाहीं. एखाद्याची फसवणूक करणं पाप आहे. जे झालं तें झालं, विवाहित स्त्रीनें पतिव्रता-धर्म पाळला पाहिजे. त्याकरितां प्रथम पतीशीं सच्चेपणानें वागलं पाहिजे. सच्चेपणाशिवाय आत्मसमर्पण करणं शक्य नाही ! प्रमोद, शीलाचे भाऊ तुम्हांला माहीत आहेत ना ? --"

हा प्रश्न ऐकून मी तिच्याकडे नुसता पहात राहिलों.

" त्यांचं एक पत्र आलं होतं. पत्रांत विशेष कांहीं नव्हतं. एवढंच लिहिलं होतं कीं, ' मी हल्लीं सिव्हिल सर्जन आहे. अद्यापि विवाह झाला नाहीं, अन् करणार नाहीं. तुझें लग्न झालें, तूं सुखांत रहा. माझ्यासारखें कांहीं काम असल्यास कळवावें. ' तें पत्र आल्यापासून माझ्या मनांत विचारचक्र सुरू झालं. मी उत्तर लिहिलें-' आपली आभारी आहें. परंतु यापुढें कृपाकरून आपण मला पत्र लिहूं नये. मी सुखांत राहण्याचा प्रयत्न करीत आहें. ' उत्तर लिहिण्यापूर्वी दोन्ही पत्रांबद्दल 'यांना'

सांगणं आवश्यक होतं. ऐकल्याबरोबर ते म्हणाले,' मला सांगण्याचं कांहीं कारण नाहीं !' असं होतं तर यांनीं माझ्याशीं लग्न कशाला केलं? कांहीं वेळानें त्यांनीं मला हरामजादी म्हणून शिवी दिली. मी उलट बोललें नाहीं. त्या दिवसापासून ते माझ्याशीं फटकून वागूं लागले. त्यांच्यावर रागावण्याचाहि मला आतां हक्क कुठं होता? ते माझी पर्वा करीनासे झाले. त्यांचंही बरोबरच होतं. मला तोही अधिकार कुठं होता? घरचं काम करावं आणि जें कांहीं पोटाला मिळेल तें खाऊन पडून रहावं, असं चाललं होतं ! परंतु मला असं वाटूं लागलं कीं मी त्यांच्या डोळ्यांत सलतेय्. मी त्यांना डोळ्यासमोर नको होतें. हें पाहून एक दिवस मी त्यांना स्पष्ट सांगितलं कीं आपल्याला मी नको असेन तर मला घराबाहेर कां काढीत नाहीं? ते म्हणाले, ' ठीक आहे, जा, आपल्या माहेरी जा. ' मी म्हटलें, ' तिथला संबंध सोडून तर मी इथं आलें आहें. आपण मला आनंदानं परवानगी दिलीत तरच मी तिकडे जाऊं शकतें. आपण रागावलां असतांना तिकडे जाणं हा माझा धर्म नव्हे. ' ते म्हणाले, ' मग तूं हवं तें कर-वाटेल तिकडे जा.'मी विचारलें, ' कुठं जाऊं? काय करूं?' ते म्हणाले, ' जा मसणांत—माझा जीव नको खाऊं !' त्यानंतर कांहीं दिवस गेले. मी त्यांच्या मार्गांत धोंड होऊन बसलें होतें. एक दिवस ते एकदम येऊन म्हणाले ' चल, चालती हो इथून ! ' ती आज्ञा मोडण्याचा मी हट्ट धरला नाहीं. त्याच शहरांत कुठं तरी दूर एका खोलींत

त्यांनीं स्वतः मला नेऊन सोडलं. बरोबर कांहीं जरूरीच्या चीजवस्तूहि त्यांनीं आणून दिल्या होत्या. अशी एकंदर हकीकत आहे. ”

मी आत्याबाईकडे पहात राहिलों. तिच्या चेहऱ्यावर कांहीं विकार उमटलेले दिसले नाहींत. मला मात्र अत्यंत वाईट वाटलें. झाल्या गोष्टींबद्दल तिची जणूं कांहीं तक्रारच नव्हती. मी मोठ्या कष्टानें म्हणालों, “ तूं लागलीच घरीं कां नाहीं आलीस आत्याबाई ? इथं भलत्या ठिकाणीं येऊन या मनुष्याबरोबर राहण्याची काय जरूर होती ? ”

“ प्रमोद, कसं सांगूं तुला ? घरीं येणं मला शक्य नव्हतं ! पूर्वीं एकदां घरीं आलें होतें. तेव्हांपासून मनाशीं खूणगांठ बांधली होती कीं अशा रीतीनें माहेरीं जाण्यांत अर्थ नाहीं. स्त्री जोंपर्यंत सासरची आहे, तोंपर्यंत माहेरची असते; सासर सुटलं कीं माहेरहि आपोआपच सुटलं ! ”

मी आश्चर्यचकित होऊन तिच्याकडे पहात राहिलों. तिच्या बोलण्याचा अर्थ मला नीट समजेना. म्हणून मला जरा रागहि आला. मी म्हणालों, “ म्हणतेस काय तूं ? तुला घरीं येववेना, आणि इथं या परपुरुषाबरोबर मात्रं राहवलं — हें काय बोलणं झालं ? ”

“ घरीं तर येणं शक्य नव्हतं ! आतां एका परपुरुषाबरोबर इथं राहण्यासंबंधीं म्हणशील, तर—तर मला त्याबद्दल कांहीं बोलायचं नाहीं. मला सांग, तो परपुरुष तरी कां म्हणायचा ? ”

" परपुरुष कां म्हणायचा ?"

" हो, तो परका नाहींच मुळीं ! मी त्याच्याशीं परकेपणानें वागतें असं तुला दिसलं कां ?"

" तो काय तुझा नवरा आहे ?"

" नवरा !—तें कांहीं मला माहीत नाहीं. माझं अस्तित्व स्वतःकरितां मात्र नाहीं. सध्यां तरी तें केवळ त्या पुरुषाची सेवा करण्याकरितांच आहे."

" सेवा ?"

" हो,—कां ? सेवा कां नाहीं ? मी ज्यावेळीं त्या खोलींत एकटी होतें त्यावेळीं मी मेलें कां नाहीं तुला माहीत आहे ? मला वाटलं होतं—आणि माझी इच्छाहि तशी होती —कीं मीं आतां मरणार ! असलं जिणं जगण्यांत तरी काय अर्थ आहे ? परंतु एकाएकी माझ्या मनांत विचार आला कीं ज्यानें आपल्याला जन्माला घातलं त्याच्या हातूनच मरण आलं तर पत्करावं. एरव्हीं अहंकाराला बळी पडून आपण होऊन मरण्याचा मला काय अधिकार आहे ? उपाशी राहून भुकेनें मरण आलं तर गोष्ट वेगळी, पण जाणूनबुजून आत्महत्त्या कशी करूं ? अशा रीतीनें उपाशी राबत असतां तिसऱ्या दिवशीं या माणसानें आपला जीव धोक्यांत घालून मला ' विचारलें ' ! आणि असें विचारण्यांत त्या माणसाचा दोष काय ? माझ्या रूपाचा त्याला मोह पडला असेल. पण त्याबद्दल त्याला दोष कसा देणार ? धोका संकट कांहीं न पाहतां तो मजकडे आला.

त्याची स्वतःचीं बायकांमुलं होती, मित्र मंडळी होती. त्यांच्याकडे दुर्लक्ष करून, त्यांच्या धमक्या, टोमणे सहन करून प्रथम चोरून, नंतर उघडपणें, त्यानें मला मदत केली. त्याच्या या चोरींत माझा भाग नव्हता. आणि मदत म्हणजे इतकीच— कधीं कोळसे आणून द्यावे, कधीं जेवण आणून द्यावं, कधीं धीराच्या दोन गोष्टी सांगाव्या. मृत्युपासून मी केव्हांच तोंड फिरवलं होतं. तिकडून तोंड फिरवून जगण्याच्या संकल्पाकडे तोंड केलं, तोंच या मनुष्याची मदत समोर आली. तिकडून तोंड फिरविणें हा न्याय झाला असता काय ? मी त्या मदतीचा कृतज्ञतापूर्वक स्वीकार केला. प्रमोद, तूं त्याला पाहिलं आहेस ना ? माझ्या रूपाच्या मोहाचा अंमल त्याच्यावर चढूं लागला. त्याला नशा चढला. मला त्या वेळीं त्याची दया आली. प्रमोद, तुला काय सांगूं, तूं लहान आहेस ! या दुर्दैवी माणसावर त्याच्या मदानें अशी कुरघोडी केली कीं सांगतां सोय नाहीं ! तो आपलीं बायकामुलें विसरला, आपला धंदा विसरला, माझ्याकरितां सर्वस्वाचा होम करायला सिद्ध झाला. एक दिवस येऊन मला म्हणतो, ‘ चल, आपण येथून पळून जाऊं. ’ मी त्याला उपदेश करण्याचा प्रयत्न केला असता तर तो ऐकून घेता ? गरम तव्यावर पाण्याचा थेंब पडल्याबरोबर तो तडतडूं लागतो, त्याप्रमाणें मी दिलेल्या थंड उपदेशानें स्फोटच झाला असता. मी त्या बिचाऱ्याला विचारलें, ‘ कुठं जाणार ? ’ तो म्हणाला, ‘ तूं सांगशील तिथं. लाडके, तूं माझं सर्वस्व आहेस ! ’ कोणत्या

दृष्टीनें मी त्याची लाडकी होतें आणि आहे, तें मी ओळखून आहें. तो केवळ स्वतःच्या वासनांचे लाड पुरवीत होता, पण त्याला त्याची कल्पना नव्हती. त्यावेळीं माझ्या जिवाची काय स्थिति झाली तें विचारूं नको! इतका त्रास मला क्वचित झाला असेल. त्याच्या प्रेमाचा स्वीकार करण्याची कल्पनाच असह्य होती. परंतु त्याबद्दल जबाबदार मीच होतें ना? आणि त्या-वेळीं मी त्याचें सर्वस्वहि होतेंच कीं! मी त्याच्या हातांतून निसटलें असतें तर त्यानें अनर्थच केला असता. स्वतः जीव दिला असता, किंवा शक्य असतं तर माझा जीव घेतला असता. खरं सांगतें प्रमोद, त्यावेळीं त्या माणसाची मला इतकी दया आली कीं माझं मला माहित! ही आपल्यावर लुब्ध झाली असून आतां आपलीच झाली, हा जो त्याचा भ्रम होता तो दूर करणं माझ्या जिवावर आलं. असं करणं मला निष्ठुरपणाचं वाटलं. माझ्याजवळ जें कांहीं उरलंसुरलं होतं तें मी त्याच्या स्वाधीन केलं. हजारबाराशेंपेक्षां जास्त तो ऐवज नसेल. सर्व कांहीं त्याच्या स्वाधीन करून ही जागा मी त्याला सुचविली आणि म्हटलं, 'ती जागा बरीच लांब आहे, तिकडे जाऊं.' हीच जागा मी कां शोधून काढली माहीत आहे प्रमोद? कारण मला माहीत होतं कीं ती तुझ्या अगदीं जवळ आहे, आणि एखादे दिवशीं तुझी खात्रीनं गांठ पडेल."

मी तिच्याकडे बघतच राहिलों. माझ्या मनांत कांहीं बिल-क्षण खळबळ चालू होती. माझ्या मनांत काय चाललें होतें तें

 Rupees recieved D.J.

माझें मलाच कळत नव्हतें — इतक्या प्रगल्भ विचारांच्या या स्त्रीचा तिरस्कार वाटत होता, कीं तिच्याबद्दल कृतज्ञता वाटत होती — कांहींच कळत नव्हतें ! ती अत्यंत निरपेक्ष व प्रेमळ दृष्टीनें मजकडे पाहून बोलत होती.

" पण तूंच मला शोधीत इथं येशील ही स्वप्नांतहि कल्पना आली नाहीं. माझ्या मनांत असं कीं अगदीं राहवेनासं झालं कीं आपणच जावं आणि दुरूनच तुला पाहून जीवाचं समाधान करून घ्यावं. प्रमोद, तूं माझ्यावर रागाव हवं तर. पण मी तुझी आत्याबाईच आहे ना ....?"

मी त्यावेळीं अत्यंत विवश झालों होतों. असें वाटलें कीं, शक्य असेल तर पळ काढावा तिथून. परंतु जागच्याजागीं खिळल्यासारखा तसाच बसून राहिलों. मनावर विलक्षण दडपण पडलें होतें. रागानें ओरडावें म्हटलें तर ओरडवेना, कीं स्नेहावेगानें रडावें म्हटलें तर रडवेना !

" प्रमोद, माझी अवस्था तुला दिसतच आहे — तुझ्यापासून लपवून काय ठेवणार ? हा गर्भ या माणसापासूनच राहिलेला आहे — "

असें म्हणून अशा निर्विकार व कठोर दृष्टीनें तिनें मजकडे पाहिलें, कीं ती दृष्टि सहन न होऊन मी उशींत माझें तोंड लपविलें .

" तुला लाज वाटत असेल--लाज वाटण्यासारखीच गोष्ट आहे ही ! मीहि ओळखून आहे कीं या माणसाला आतां घरची आठवण

होऊन माझा कंटाळा आला आहे. जेव्हां सर्वांना सोडून मला घेऊन जायला तो उतावीळ झाला होता तेव्हांहि मला कल्पना होतीच कीं थोड्याच दिवसांत तो पुन्हां आपल्या बायकामुलांकडे परत जाणार. या अनिर्बंध अनुरक्तीची परिणति प्रबल विरक्तींत होणार आहे हेंहि मला समजत होतें; आणि समजत होतें म्हणूनच मी त्याला बरोबर घेऊन आलें. या विरक्तीला आतां सुरवात झाली आहे. त्याला आतां जाणें भाग आहे. त्याची बायकापोरें तिकडे एकटीं आहेत. यापुढें मला सांभाळणें त्याच्यानें होणार नाहीं. त्याला माझा कंटाळा यावा असा प्रयत्न मी मुद्दाम करीत आहे. माझी अवस्था मला कळते. पोटांत मूल आहे. परंतु अशा अवस्थेंतहि स्वार्थ मनांत आणणें योग्य नाहीं. त्याला परत त्याच्या कुटुंबांत नेऊन बसवीन तेव्हां मला बरं वाटेल. ही अक्कल त्याला सुचण्याचीहि वेळ आली आहे. त्याचा मोह पार नाहींसा झाला आहे. मी त्याचें सर्वस्व नाहीं, तर एक वाईट चालीची व्यभिचारी स्त्री आहे ही गोष्ट त्याला कळून चुकली आहे–"

उशींत तोंड लपवून मी तिचें सर्व बोलणें ऐकत होतों. माझ्या मनाला इतका त्रास कधीं झाला नव्हता. आंतल्याआंत तें गुदमरल्यासारखें होत होतें आणि त्याला वाट मिळत नव्हती. डोळ्यांतून पाण्याचें टीपहि बाहेर पडत नव्हतें.

" मी तुला सांगतें, महिन्या दोन महिन्यांच्या आंत हा मनुष्य येथून निघून जाईल आणि माझ्याजवळ एक फुटकी कवडीसुद्धां ठेवणार नाहीं. दुनिया पैशाची आहे, तेव्हां जे

कांहीं सातआठशें रुपये हातीं येतील ते संकटकाळीं उपयोगीं पडतील, हें तो जाणून आहे. ही काय बोलूनचालून स्वैराचारी स्त्री आहे, ती कसेहि दिवस काढील, तिच्याजवळ पैसे ठेवण्याची कांहीं जरूरी नाहीं, असाच तो विचार करणार. मी हें सर्व ओळखून आहे, आणि ओळखून आहे म्हणूनच काळजी करीत बसत नाहीं. पण — पण या पोटांतल्या गोळ्याचं कसं होणार? .... "

हें बोलतांना तिनें एक दीर्घ निःश्वास सोडला. तें पाहून माझें गुदमरलेलें अंतःकरण एकदम थरारलें !

" काय होणार ? -- काय होणार तें एका परमेश्वराला माहीत ! मला दुसरा कोणताही आसरा नाहीं. पण तो परमात्मा सर्वांतर्यामी आहे, सर्वशक्तिमान आहे. मला दुसरा आसरा पाहिजेच कशाला ? "

यानंतर कांहीं वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. मी तसाच उशींत तोंड खुपसून उपडा पडलों होतों. कांहीं वेळानें ती म्हणाली-

" प्रमोद, म्हणूनच मी म्हणतें कीं जोपर्यन्त हा मनुष्य माझ्याजवळ आहे तोपर्यंत तो परपुरुष नाहीं. माझं सर्व कांहीं त्याचं आहे. त्याच्या सेवेंत मी अंतर पडूं देणार नाहीं. पतिव्रताधर्म हेंच सांगतो — "

पुन्हां थोडावेळ कोणीं कांहीं बोललें नाहीं. सर्व स्तब्ध झालें. जणूं कांहीं सर्व कांहीं थांबलें होतें -- काल थिजून दगड झाला होता. इतकी निःशब्दता पसरली कीं आमचे श्वास हाय — हाय

म्हणून मोठ्यानें ओरडत होते कीं काय असें वाटत होतें. अशा स्थितींत बराच वेळ गेला. मनस्ताप दु:सह झाला. एकाएकीं त्या बर्फासारख्या शांततेचा भंग करून आत्याबाई म्हणाली—

" प्रमोद तुला झोंप मुळींच लागली नाहीं, आणि मी कांहीं-तरी बडबड करीत राहिलें. सांगण्यासारख्या, न सांगण्यासारख्या, कित्येक गोष्टी बोलून गेलें. जगांत तूं एकटाच असा आहेस कीं ज्याच्याशीं परकेपणानें वागणें मला शक्य नाहीं. बरं तर, तूं आतां विश्रांति घे. मी जरा शेजारच्या एका मुलाला पाहून येतें."

मी कांहीं न बोलतां तसाच पडून राहिलों. आत्याबाई निघून गेली.

---



मला झोंप येईना. मन बावरल्यासारखें झालें होतें. जी हकीकत ऐकली तिचा स्वीकार कसा करूं? मनाला ती सोसवेना. तिच्यापासून सुटका करून घेऊन तेथून निघून जावें हाच उपाय होता. असें वाटलें कीं आपल्या पूर्वींच्या जगांत पुन्हां परत जावें, — जिथें वस्तूंचीं मूल्यें ठराविक असतात आणि कोणतीहि भानगड नसते; जिथें वाटा मळलेल्या असून स्वतःला नवीन शोधण्याची आवश्यकता नसते; जिथें जिज्ञासा शांत असते आणि प्रश्न अवज्ञेचा द्योतक ठरतो.

या आत्याबाईचें मी काय करूं? तिच्या या खोलींत मी काय करूं शकतों? येथें सगळाच कारभार उलटासुलटा झाला आहे. आपल्या पतीचें घर सोडून या घाणेरड्या व्यभिचार-कर्दमांत लोळणारी ही बाई पतिव्रताधर्माच्या गोष्टी सांगते आणि त्या ऐकून घेणारा माझ्यासारखा सुशिक्षित समजूतदार

तरुण तिचा धिःकार करण्याऐवजीं उलट तिच्याकडे अधिकाधिक आकर्षिला जातो— ओः असह्य आहे हें !

छेः चुकलेंच माझें – अगदीं चुकलें ! मी जाणार येथून, इथें नाहीं राहणार आतां. आत्याबाई घरीं येणें शक्य नाहीं. मी पाहिलें, तिला घरीं घेऊन जाणें माझ्या शक्तीबाहेरचें आहे. तिनें स्वीकारलेल्या मार्गापासून तिला एक पाऊलभरही हटविणें मला शक्य आहे का ? मला नाहीं वाटत. मी कांहींच करूं शकेनसं वाटत नाहीं— ती मला कांहीं करूं देणार नाहीं. तिची बुद्धीच फिरली आहे. सुधारण्याची तिची इच्छा नाहीं, तेव्हां मी तिला काय सुधारूं शकणार ? बाकी खरें सांगायचें म्हणजे माझ्या मनांत आतां अशीच शंका उत्पन्न झाली कीं खरोखर सुधारणा कोणाची व्हायला पाहिजे आहे – तिची का माझी ? ही शंका असह्य होती. मी बी. ए. च्या वर्गांत शिकणारा तरुण होतों; उच्च विचारांच्या वातावरणांत वावरणारा, उच्च ध्येयाकडे दृष्टि लावून बसलेला तरुण होतों; आपल्या मोठेपणाच्या ऐटींत होतों. या मोठेपणापलीकडे कुठेंहि – ज्यांना मी कमी लेखतों त्यांमध्येंहि—सच्चेपणा आहे हें मानावयास मी तयार नव्हतों; आणि मान्य झालें तरी तें सहन करण्याची माझी तयारी नव्हती. मला मोठेपणा पाहिजे होता ना ?

मी एकाएकी उठून बसलों. अंथरूणेंपांघरूणें उचलून एकेकाची घडी घालून बाजूला रचून ठेविलीं. मनांत विचार केला कीं ही खोली व्यवस्थितपणें लावून ठेवण्यास आपल्याला आणखी

कांहीं करतां येणार नाहीं का ? पण तसें कांहीं काम सुचेना. खोलींतील प्रत्येक वस्तु जागच्याजागीं व्यवस्थित ठेवलेली होती. आधींच झाडून स्वच्छ केलेली खोली आपण पुन्हां एकदां झाडायला काय हरकत आहे, असा विचार केला. बूट घालून त्याचे बंद बांधले आणि हातांत केरसुणी घेऊन झाडूं लागलों. मुकाट्यानें कोणास नकळत तेथून निघून जाण्याचा धीर होईना. मनावर कृतज्ञतेचें जें ओझें झालें होतें तें कमी करणें आवश्यक होतें !

परंतु झाडणें पुरें होण्यापूर्वींच आत्याबाई येऊन उभी राहिली. त्याबरोबर मी ओशाळलों आणि चटकन् केरसुणी हातांतून फेंकून देऊन असा उभा राहिलों कीं जणूं कांहीं मी पूर्ण निर्दोष असून चुकून आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा होतों.

" प्रमोद, हें रे काय मांडलंय्स् ? आतांच निघालास कीं काय ? झोंपला नाहींस का ?"

" हो, आतां जायला पाहिजे. "

" जायला हें पाहिजेच; पण केरसुणी घेऊन झाडण्याइतका कांहीं खोलींत केर झालेला दिसत नाहीं ! अन् काय रे, आतांच निघालं पाहिजे का ? "

" आईनें घरीं बोलावलं आहे. मी सांगितलं ना, घरीं लग्नाच्या गोष्टी चालल्या आहेत. म्हणून जायचंय्. "

" लग्नाच्या गोष्टी ? "

" मी सांगितलं नाहीं का— ?"

" मी ऐकलं नसेल. एकूण लग्नाच्या गोष्टी चालल्यात अं? तुझ्या लग्नाला मलाहि यायचं होतं— "

" यायचं होतं म्हणजे काय? यायलाच पाहिजे!"

ती लाजून म्हणाली–

" हो रे, येईन मी; पण मी असलीं कर्मं करून ठेवलेलीं–! निश्चित झालं का?"

" मला विचारल्याशिवाय निश्चित कसं होईल, आत्याबाई? अन् मी इतक्यांत लग्नच करणार नाहीं —"

मला पुढें बोलूं न देतां ती म्हणाली –

" केव्हां जाणार? आतांच? आतां गाडी आहे का?"

या प्रश्नांचें उत्तर न देतां मी विचारलें –

" खरं सांग, आत्याबाई, तूं लग्नाला सुद्धां येणार नाहींस?"

" कशी येणार रे?"

" कशी येणार म्हणजे? जसे इतर लोक येतील तशी तूं ये. मला समाजाची मुळींच पर्वा नाहीं!"

" तूं पर्वा केली नाहींस तर चालेल बाबा, पण मला पर्वा न करून कसं चालेल? समाज मोडणें मला पसंत नाहीं. समाजच नाहींसा झाला म्हणजे आपली उन्नति किंवा अवनति व्हायची असेल ती कशांत होणार? म्हणून समाजाच्या बाहेर राहून त्याच्याबद्दल मंगल इच्छा – आकांक्षा बाळगून स्वतःच झिजत राहणें एवढेंच मी सध्यां माझें कर्तव्य समजतें. तुझ्या लग्नांत

मला दूर राहून मनांतल्या मनांत झुरत बसावं लागेल असं कधीं स्वप्नांत तरी आलं होतं काय ? "

हें बोलणें चाललें असतांना मी त्या रचून ठेवलेल्या कपड्यांच्या राशीवर येऊन बसलों होतों. मी तेथूनच म्हणालों, " मग मला सुद्धां आतां तुझ्याकडे येण्याची आवश्यकता नाहीं हेंच ना ? "

आत्याबाईनें लागलीच म्हटलें,

" होय, तसंच ! परंतु आवश्यकतेमुळें जीं कामें करावीं लागतात त्यांच्या व्यतिरिक्त कधींकधीं अगदीं अनावश्यक अशाहि गोष्टी आपणाकडून होतात. तूं इथं आलास ही गोष्टहि तशाच पैकीं नाहीं का ? कोणतीहि आवश्यकता त्याच्या आड येऊं शकली नाहीं, आणि तूं इथं आलासच ना ? तसंच— "

मी मध्येंच म्हटलें, " आतां नाहीं येणार ! "

" नकोच येऊं ! मी तुला हेंच समजावून सांगणार होतें. जे लोक समाजांत राहतात, त्यांच्यावर समाजाची प्रतिष्ठा कायम राखण्याची जबाबदारीहि आहे. तें त्यांचें कर्तव्य आहे. जे लोक समाजाच्या दृष्टीनें निर्माल्य आहेत किंवा आपण होऊन निर्माल्य होऊं इच्छितात, त्यांनाच जीवनाशीं नवीन प्रयोग करण्याची मोकळीक असते. प्रमोद, सत्याला नेहमीं नव्या प्रयोगांची अपेक्षा असते हें ठीकच आहे. परंतु या प्रयोगांत अशा लोकांनींच पडावें कीं ज्यांच्या जीवाला समाजाच्या दृष्टीनें कांहीं बाजारभाव नाहीं — "

मी अंडर ग्रॅज्युएट — पण मला तिचें बोलणें मुळींच समजलें नाहीं! आज त्या गोष्टी मला आठवतात. आणि मला आतां निश्चित पटतें कीं जें ज्ञान शास्त्राभ्यासानें मिळत नाहीं तें आत्मव्यथेनें मिळतें! एरव्हीं इतकीं गंभीर जीवनसत्यें सहजपणें आत्मसात् करणें व तीं व्यक्त करणें, हा जो अधिकार आत्याबाईनें प्राप्त केला होता त्याचें रहस्य दुसरें काय असूं शकतें? मी त्यावेळीं तिला म्हणालों होतों —

" आत्याबाई, मी आतां पुन्हां येणार नाहीं. मी मदत करण्याच्या हेतूनें आलों होतों. परंतु मी पाहिलं, माझी मदत कोणाला नको आहे. बस, आतां मी येणार नाहीं! "

मला आतां आश्चर्य वाटतें कीं असें बोलण्याची हीनबुद्धि मला त्यावेळीं कशी झाली! याला आत्याबाईनें जें उत्तर दिलें तें मला चांगलें आठवतें. ती म्हणाली होती —

" प्रमोद, मदत मला नको आहे का? तुझ्याकडून मदत घ्यायची नाहीं तर घ्यायची कुणाकडून? परंतु मला मदतीचा हात देऊन तूं काय करणार आहेस? येथून उचलून मला उच्च वर्गांत नेऊन बसविण्याची तुझी इच्छा आहे काय? असं असेल तर, बाबा, माफ कर. माझी तशी इच्छा नाहीं. मला मदत पाहिजे, पण कशाकरितां? माझें मन इतकं घट्ट व्हावं कीं कोणी मला दाबण्याचा प्रयत्न केला तरी मी दबूं नये, आणि माझ्यामध्यें इतका जिवंतपणा कायम रहावा कीं त्याच्या पापाचा भार मी आपल्या शिरावर घेऊन सर्वांकरितां क्षमा

याचना करूं शकावें — एवढ्या करितां ! प्रतिष्ठा मला काय करायची आहे ? मला जें कांहीं मिळत आहे त्यांतच समाधान मानून राहण्याची शक्ति मला पाहिजे आहे. ”

त्यावेळीं तिचें बोलणें मला मुळींच समजलें नव्हतें; आणि उत्तरादाखल मी हळूच म्हटलें होतें, “ मी जाऊं ? ”

ती म्हणाली, “ बरं, ये हं ! सुखांत रहा. ”

जातां जातां मन अत्यंत घट्ट करून मी म्हणालों, “ जरूर लागली तर लिही मला. ”

तिनें हंसून म्हटलें, “ बरं लिहीन हं ! ”

मी उठलों, कोट चढविला आणि हॅट हातांत घेतली. अशा तऱ्हेनें अगदीं जायला निघालों असतां तिच्या समोर उभ्या उभ्या माझ्या डोक्यांत विलक्षण काहूर उठलें होतं. झटकन् पुढें होऊन तिचे पाय धरूं का ? धरावेच आतां ! पण छेः ! माझ्यानें कांहींच करवेना. शेवटीं जणूं कांहीं उशीर होत आहे अशा बहाण्यानें मनगटावरील घड्याळाकडे पाहून तिला नमस्कार करून म्हटलें —

“ बरं आहे आत्याबाई, येतों— ”

आणि झटकन् तेथून बाहेर पडलों !

जातां जातां आत्याबाईचे “ ये हं, मजेंत रहा ” हे शब्द ऐकूं आले. या आशीर्वचनांतील प्रेम व कंपन कानावर पडल्या-

बरोबर माझी गति अधिकच तीव्र झाली. जणूं कांहीं थोडासा थांबलों असतों तर कुणी मला धरून ठेवणार होतें. झपाझप पावलें टाकीत बाहेर आलों आणि स्टेशनचा रस्ता धरला. बाहेर तें कोळशाचें दुकान दिसलें. तो गृहस्थ तराजूच्या दांडीवर हात ठेवून गिऱ्हाइकांना कोळसे देत होता. तो मला पाहील कीं काय या भीतीनें खालीं मान घालून झटकन् तेथून निघून गेलों आणि भरभर स्टेशनकडे चालूं लागलों.

---

# ७

घरीं पोंचल्यावर आईनें विचारलें, " कुठं थांबला होतास कीं काय ? सतीश सांगत होता कीं तूं त्याच्या आधीं एक दिवस कॉलेजांतून निघाला होतास— "

मी म्हटलं, " आत्याबाईच्या शोधांत होतों. ती जवळच्या एका गांवीं राहते. "

जणूं विंचू डसल्याप्रमाणें आई ओरडली, " कोण ? "

" आत्याबाई. मी तिला भेटूनच येत आहे. "

" का ऽ य ? "

" आई, ती आपल्याकडे परत येऊं शकणार नाहीं का ? "

आई ओरडून म्हणाली—

" हे बघ प्रमोद, तुझी आत्याबाई आतां आपली कोणी नाहीं ! माझ्यासमोर तिचं नांव काढलंस तर पहा ! "

" पण आई, " मी म्हटलें, " मी तिला विसरणें शक्य नाहीं. "

“ तूं वाटेल तें कर, पण माझ्यासमोर तिची गोष्ट काढलीस तर खबरदार ! कुळबुडवी कुठली ! ”

आत्याबाईचें नांव काढल्यामुळें आईच्या मनाला जे कष्ट होत होते त्याची योग्य कल्पना येणें कठीण होतें. ते कष्ट कांहींसे तिच्या शद्बांत प्रकट होत होते. त्यावेळीं तें माझ्या ध्यानांत आलें नाहीं आणि त्यामुळें माझ्यामध्यें व आईमध्यें थोडासा दुरावा उत्पन्न झाला.

त्यानंतर आईनें लग्नाचें बोलणें काढलें. ती गोष्ट मी मान्य करूं शकलों नाहीं हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. आई रागावली. परंतु मी विचार केला — रागावेना, अखेर जगांत आपण एकटेंच आहोंत, कोणी कोणाचें नाहीं, नातींगोतीं वगैरे केवळ जंजाळ आहे !

जीवन वाहतच होतें. बी. ए. ची परिक्षा जवळ आली होती व मला आतां पोझिशन् मिळवावयाची होती. आत्याबाईची आठवण मनांत खोल रुजूं न देण्याची मी शक्य तितकी काळजी घेत होतों. फायदा काय ? परंतु ती आठवण अतिशय खोल जाऊन बसली होती. त्या कारणानें मला जगांतील बहुतेक सर्व गोष्टी व्यर्थ व निरुपयोगी वाटूं लागल्या होत्या. सुख असार वाटूं लागलें होतें आणि दुःख सार. मनांतील महत्त्वाकांक्षा आंतल्याआंत विझत चालल्या होत्या आणि जीवनाला तीक्ष्णता आणणारी मनुष्यामनुष्यांतील स्पर्धा निरर्थक व हास्यास्पद वाटूं लागली होती. अशा मनःस्थितींतहि मी वल्हें सोडून देऊन स्वतःला वाहवूं देऊं इच्छित नव्हतों.

....तिकडे काय झालें असेल? तो मनुष्य निघून गेला असेल काय? नंतर काय झालें असेल? जाऊं द्या, कांहीं कां होईना! मी नाहींतरी काय करणार होतों? मला कांहीं तरी करणें शक्य होतें का? ....

मनांत एक प्रकारची गांठ बसत चालली होती. ती धड सुटत नव्हती कीं सैलहि होत नव्हती. उलट सोडविण्याचा प्रयत्न केल्यानें ती अधिकच गुंतत जाऊन घट्ट होत होती. मनांत वाटत होतें कीं कांहींतरी झालें पाहिजे—केलें पाहिजे; कांहींतरी कांहींतरी चुकत आहे, कांहींतरी गोंधळ आहे; कुठेंतरी कां, सगळाच गोंधळ आहे! सृष्टिरचना चुकीची आहे; समाजरचना चुकीची आहे; आमचें जीवनच चुकीचें आहे; सर्व सृष्टिचक्र म्हणजे एक गोंधळच आहे! त्यांत तर्क नाहीं; संगति नाहीं; कांहीं नाहीं. म्हणूनच कांहीं तरी करायला पाहिजे! पण का....य? असें काय आहे कीं जें कर्तव्य आहे–भवितव्य आहे?

धरूं म्हणतां कांहीं हातांत येत नव्हतें आणि आंतल्याआंत गुदमरल्यासारखें होत होतें.. त्यांतच मित्रमंडळींशीं गांठीभेटीहि फार कमी होऊं लागल्या होत्या. ते मला चिडवूं लागले होते. परंतु त्यांच्या चिडविण्याचें मला कांहीं वाटत नव्हतें. परीक्षा जवळ आली आहे, तींत आपल्याला चांगल्या तऱ्हेनें पास व्हावयाचें आहे व पुढें जावयाचें आहे, ही मनाशीं पक्की खूण-गांठ बांधली होती. परंतु जीवनाची सामाजिक बाजू सांभाळ-

ण्याची मनाची इच्छा मंदावत गेली; ती प्रवृत्तीच सुकून गेली. लोकांमध्यें कमी किंवा अजिबात न मिसळल्यानें, हास्यविनोद, खेळ, वगैरेंत सामील न होण्यानें, जीवनांत कांहीं कमी पडत आहे असें मला कधींच वाटलें नाहीं. कांहीं गोष्टी करण्यायोग्य असून त्या आपण करीत नाहीं असेंहि कधीं वाटलें नाहीं. अशाच मनःस्थितींत एक दिवस कॉलेजांतून निघालों आणि गाडी पकडून त्या गांवीं येऊन उतरलों.

पण तेथें तें कोळशाचें दुकान कोठें होतें ? त्या खोलींत कोणी दुसरेच लोक राहत होते. इकडे तिकडे विचारलें, परंतु कांही निश्चित पत्ता लागला नाहीं. त्या गृहस्थाबद्दल एवढेंच कळलें कीं बऱ्याच दिवसांपूर्वीं तो आपल्या ' बायकोला ' मारहाण करून कुठेंतरी पळून गेला होता. पुढें त्या बायकोचें काय झालें हें नक्की कोणालाच माहीत नव्हतें. ' नवरा ' निघून गेल्यानंतर ती महिना दीड महिना तेथेंच होती एवढी बातमी मात्र लागली. लोक सांगत होते कीं ती कपडे वगैरे शिवून आपलें पोट भरीत असे; बाई फार चांगली होती; संकटकाळीं अनेकांना धीर देत असे, मदत करीत असे; लहान मुलांना घरीं बोलावून शिकवीत असे आणि सर्वांची लहान मोठी कामें करण्यास तयार असे; परंतु पुढें कुठें गेली कोणास ठाऊक !

अधिक चौकशी करतां असें कळलें कीं तिचे दिवस भरले होते; त्याची तिला अतिशय काळजी लागून राहिली होती; आणि कधीं कधीं हॉस्पिटलमध्यें जाण्याच्या ती गोष्टी करीत असे.

मी हॉस्पिटलमध्यें जाऊन चौकशी केली. असें कळलें कीं, मिशनच्या हॉस्पिटलमध्यें पांच महिन्यापूर्वी मिनाल नांवाची एक बाई आली होती; तिला तेथें मुलगी झाली; जन्मल्यानंतर चौथ्या दिवशीं त्या मुलीला देवी आल्या; ती जनरल वॉर्डमध्यें होती; यापेक्षां नर्सला जास्त कांहीं आठवत नव्हतें. पंधराएक दिवसांनीं मुलगी बरी झाली असावी, कारण त्या दिवसापासून मायलेकींचें नांव रजिस्टरमध्यें नव्हतें.

" कुठं गेली ? " मी विचारलें.

माझा प्रश्न ऐकल्याबरोबर हॉस्पिटलची मुख्य डॉक्टरीण माझ्याकडे पहातच राहिली.

" या प्रश्नाचें उत्तर आम्हीं देऊं शकूं असं आपल्याला खरोखर वाटतं का ? " ती जरा रागानें म्हणाली.

मी म्हटलें, " कां बरं ? कदाचित् देऊं शकाल, कोणी सांगावं ? "

" मला तुमचं आश्चर्य वाटतं ! "

मी म्हटलें, " बरं एक गोष्ट विचारूं का ? तिनें आपलं मूल मिशनमध्यें तर नाहीं ठेवलं ? "

" हं—हं, आतां आठवलं ! कोणता महिना-सप्टेंबर काय ? बरोबर आहे. तीच केस असेल. वय किती होतं ? "

" असेल चोवीस-पंचवीस. "

" बरं – बाई गोरटेली होती का ? "

" हो, साधारण. "

" बस—बस, तीच केस असली पाहिजे. ती आमच्याकडे कांहीं कामहि मागत होती. नर्स व्हायला तयार होती. इंग्रजी शिकलेली होती ना ? मुलगी चांगली होती, मला आठवतं ! मी तिला म्हटलंहि होतं कीं मूल मिशनला देऊन टाक आणि तूंहि प्रभु येशूच्या धर्मांत ये, म्हणजे तुला येथें रहायला मिळेल आणि कामहि शिकायला सांपडेल. पण तिनं ऐकलं नाहीं. हिंदु लोकांचं हेंच तर आहे ! ती तुमची कोण लागते—तिची जरा समजूत घाला ! येशू ईश्वराचा प्रेषित आहे. जगाला खरा मार्ग दाखविणारा तोच आहे. त्याच्यावर विश्वास ठेविला पाहिजे, समजलं ? तिला जरा समजावून सांगा. "

मी विचारलें, " नंतर काय झालं ? ती नाहीं राहिली का ? मग गेली कुठं ? "

" इथून कुठंतरी गेली. यापेक्षां मला आपल्याला जास्त मदत करतां येणार नाहीं. "

माझ्या परीक्षेचे दिवस जवळ आले होते. तिथें जास्त दिवस घालविणें मला शक्य नव्हतें. मी निघून आलों.

पुन्हां अभ्यासाला लागलों. मला राहून राहून आश्चर्य वाटत होतें कीं लहानपणीं ज्या आत्याबाईला मी सारखा बिलगून असे, तीच आतां शोध करूनहि सांपडत नाहीं ! जी आत्या-बाई माझ्यावर इतकें प्रेम करीत असे ती आतां मला टाळूं पहाते ! मी विचार करूं लागलों, या जगांत आम्हीं माणसांनीं कसे कसे तट निर्माण केले आहेत — कीं जे दोन जीवांना फाडून

त्यांची ताटातूट करतात ! मनें फाटण्याकरितां आहेत, कीं एक-मेकांशीं जुळून राहण्याकरितां आहेत ?

माझ्या लग्नाचीं बोलणीं पुन्हां सुरू झालीं होतीं. या खेपेचा संबंध आईला फार आवडला होता. कुल, शील, संपत्ति या सर्व दृष्टींनीं ठिकाण चांगलें होतें. मुलगीहि दिसण्यांत सुरेख होती, सुशील व शिकलेली होती. मी एकदां मुलीला पहावयाचें व मुलीनें मला पहावयाचें एवढेंच राहिलें होतें. ही गोष्ट मी कित्येक दिवस टाळीत आलों होतों. कां कुणास ठाऊक, मला भारीच संकोच वाटत होता. स्वतःबद्दलच माझ्या मनांत शंका उत्पन्न होत होती. माझा आत्मविश्वास कुठें खोल दडून बसला होता कुणास ठाऊक ? माझी स्तुति करणारे थोडेथोडके नव्हते, परंतु या स्तुतीचें कारण मला कुठेंच सांपडत नव्हतें. उलट माझें मला स्वतःमध्यें जें कांहीं दिसत होतें त्यानें मी अधिक निराशच होत होतों.

परंतु या खेपेस मला मुलगी पहावयास जाणें भाग पडलें. आणि योगायोग पहा, त्याच घरीं ( ते गृहस्थ डॉक्टर होते ) माझी आणि आत्याबाईची गांठ पडली !

डॉक्टरांच्या घरीं पाहिलें तों एक बाई लहान मुलांना शिक-वीत बसली आहे—आत्याबाईच होती ती. त्यावेळीं मी तिच्याशीं बोललों नाहीं आणि तिनेंहि मला पाहून न पाहिल्यासारखें केलें. मला मात्र तेथें गेल्यानंतर अगदीं बावचळल्यासारखें झालें.

मला मुलीनें नापसंत केलें नाहीं. (निदान माझी अशी अशी कल्पना झाली.) मी तिला नापसंत करण्याचा प्रश्नच नव्हता. तिला पाहिल्याबरोबर तिच्या रूपगुणांबद्दल मी विचारच करूं शकलों नाहीं. मला तितकी शुद्धहि राहिली नाहीं. ही मानवकन्याच आहे ना? – तर मग स्वर्गांतील परी आणखी कशी असते? राजनंदिनीला (हें त्या मुलीचें नांव) पाहिल्या-बरोबरच माझा निश्चय होऊन चुकला. पण माझें दुर्दैव असें कीं त्यावेळीं माझें वाक्चातुर्य मला सोडून पार कुठेंच्या कुठें पळून गेलें होतें! मी लाजलों. माझ्या तोंडून एक शब्द बाहेर येईना! या माझ्या असहायतेबद्दल माझी मलाच चीड आली. माझा राग माझ्या चेहऱ्यावरहि उमटला असावा. कारण मुलगी मला पूर्णपणें पसंत पडली नाहीं असा सर्वांचा ग्रह झाला अस-ल्याचें मला नंतर कळलें. हा त्यांचा भ्रम मी लवकरच नाहींसा केला ही गोष्ट वेगळी.

आतां त्यांच्या घरांत मला खूष ठेवण्याची जो तो पराकाष्ठा करूं लागला. आधींपासून सर्वांना आमचें स्थळ आवडलें होतें. आणि आतां तर काय? भावी सासूबाईचें तर विचारूंच नका! माझ्याभोंवतीं त्या एकसारख्या गोंडा घालून असत. एक दिवस सहज गोष्टीवरून गोष्ट निघतां मी म्हटलें, "मुलं शाळेंत जातात ना? कां घरींच शिकवितां?"

त्या म्हणाल्या, "हो, शाळेंत जातात ना! पण तिथं काय मेले शिकवितात? आणि घरीं असा दंगा करतात कीं कांहीं

विचारूं नका ! म्हणून एक मास्तरीण ठेवली आहे, आणि शिवाय एक मास्तर येतात. महिन्याला तीस रुपये निराळे शिकवणीवर खर्च करतें मी ! तेव्हां कुठं — "

" मास्तरीणबाई चांगलं शिकवतात का ? "

" हो, तशी बाई चांगली आहे. गरीब आहे. बोलूनचालून बरी आहे आणि शिकवतेंहि चांगलं. शिवाय समाधानी आहे."

" मुलांना बाई आवडतात का ? "

" हो – हो, तर ! दोन महिने झाले आमच्याकडे लागून, पण आम्हांला तिची फार मदत झाली आहे. "

" इथं कुठं शाळेंत शिकवते वाटतं ? "

" हो, इथं शाळेंत मास्तरीण आहे. आम्हीं देऊन काय देणार – आठ दहा रुपये देतों. कांहीं तसं ठरवलंसुद्धां नाहीं. आठ दहा रुपयांत कसं भागणार ? पण चला – गरीब आहे, तेवढीच मदत ! बोलावूं तिला ? "

मी म्हटलें, " छे – छे, कशाला उगाच ? "

त्या म्हणाल्या, " त्यांत काय झालं ? लागेल तेव्हां मी तिला बोलावून घेते व ती लागलीच येतेहि. एकटीच आहे, आमच्या घरीं जरा कामाला हात लावते त्यामुळें तिच्या मनाला तेवढा विरंगुळा होतो आणि आम्हांलाहि मदत होते. चांगली आहे मुलगी ! कधीं बोलण्याचालण्याचा राग मानीत नाहीं. "

" तुमच्या इथला बराच लळा लागलेला दिसतो तिला. "

" हो, नेहमीं येत जात असते ना! या लग्नाची तिला भारीच उत्सुकता लागून राहिली होती. बिचारीच्या स्वतःच्या नशीबीं संसारसुख नाहीं! तुम्हाला पाहण्याची तिला फार इच्छा होती. आज दिसत नाहीं कुठं—कुठं गेली आहे कुणास ठाऊक! कांहींतरी काम असेल, नाहींतर तुम्हांला पाहण्याची तिला भारी उत्सुकता होती — "

" मला ? "

" हो ना! ताई ( राजनंदिनी ) वर तिचं भारी प्रेम. सर्वांचीच ती लाडकी आहे म्हणा! थांबा हं, तिला बोलावतेंच. बोला जरा तिच्याशीं — "

मी चटकन् म्हटलें, " छेः छेः कशाला उगाच ? कांहीं काम नाहीं तसं – " खरोखर मी आमच्या भावी सासूबाईबरोबर बोलणें वाढवूं इच्छित नव्हतों. परंतु त्यांनीं एकदां बोलावयास सुरवात केली कीं त्या बोलण्याला अंतच नसे. त्या पुन्हां म्हणाल्या, " आत्तां बोलवणं पाठवतें हं तिला – "

मी जरा जोरानें म्हणालों, " छेः छे, राहूं द्या हो! कशाला उगाच एखाद्याला त्रास ? "

" त्रास कसला त्यांत ? एरव्हीं कोण तिला बोलावतंय् ? "

मी सहज विचारलें, " कां बरं ? "

" ती अनाथ विधवा—कुठल्यातरी दूरच्या गांवची आहे म्हणून सांगते. इथं तिच्या घरचं आहे कोण ? "

मी विचारलें, " इथं राहते कुठें ? जवळच असेल ना ? "

“ जवळच राहते – दोन तीन मिनिटाच्या रस्त्यावर. ”

मी चटकन् म्हटलें, “ जाऊं द्या. बोलावण्याची जरूर नाहीं.”

“ बरं राहूं द्या. तिला बिचारीला कशाला उगाच त्रास ? आतां तुम्हीं विश्रांति घ्या जरा. ”

मला विश्रांतीची मुळींच आवश्यकता नव्हती. परंतु तेथून उठून जाऊन माझी सुटका केल्याबद्दल मात्र मनांतल्या मनांत मी सासूबाईंचे आभार मानले !

त्याच दिवशीं संध्याकाळीं मी आत्याबाईच्या घरीं गेलों. शाळेजवळच एका लहानशा जागेंत ती राहत होती. मी गेलों तेव्हां रुमाल किंवा कांहींतरी भरीत बसली होती. मला पाहिल्या-बरोबर म्हणाली, “ या ! ” आणि समोर माझ्याकरितां एक चटई अंथरली.

बसल्यावर थोडा वेळ मी तिच्याकडे पहात राहिलों. कोणींच कांहीं बोललें नाहीं. ती बिनकांठाचें पांढरें पातळ नेसली होती. केसाचा सैल अंबाडा बांधला होता. डोळ्यांतील प्रेमळपणा कोणाचीहि दृष्टि आकर्षून घेणारा होता. देहयष्टि सुकून गेलेली दिसली. परंतु चेहरा शांत दिसला. जणूं कांहीं स्वतःच्या भाग्या-बद्दल पूर्ण समाधान आहे; कसलीहि चिरचिर नाहीं, पिरपिर नाहीं; जें दुःख वांट्याला आलें तें सर्व मुकाट्यानें पिऊन टाकलें आहे; त्या सर्वांचा रस होऊन गेला आहे, गाळ मुळींच राहिला नाहीं !

शेवटीं मीच बोलण्यास सुरवात केली. “ मी आधीं तिकडे गेलों होतों — ”

ती शांतपणें म्हणाली – " मला कल्पना होतीच तूं जाशील म्हणून – "

" हॉस्पिटलमध्येंहि गेलों होतों. तूं मला कांहीं कळवलं नाहींस ! "

" काय कळवायचं ? "

" बरं, मुलगी कुठं आहे ? "

" मेली. "

" म्हणजे ? केव्हां मेली ? कशानें मेली ? "

" दहा महिन्यांची होऊन गेली. आजारी होती; कांहींशी उपासमारीनेंहि मेली ! "

मी चुप्पच झालों. थोड्यावेळानें म्हटलें —

" मिशनचे लोक मुलगी मागत होते ना ? कां नाहीं देऊन टाकलीस ? "

ती गप्प राहिली. कांहीं वेळानें म्हणाली –

" चूक झाली माझी. पण आई झालें हीच मोठी चूक नाहीं का ? "

मी बोललों नाहीं. परंतु गप्प बसवेना. म्हटलें –

" इथं कशी आलीस ? "

" आलें अशीच भटकतभटकत ! "

यावर काय बोलणार ? स्वस्थ बसलों झालें ! ' भटकत आलें ' ! पण हें भटकणें आतां पुरें झालें असें वाटत असल्याचें कांहीं तिच्या चेहऱ्यावर दिसत नव्हतें. पुढेंहि

भटकावयाचें आहेच—नशिबांत नेहमीं भटकणेंच लिहिलें आहे, हें जणूं आपण जाणून आहों आणि त्याचा कांहींएक न बोलतां मुकाट्यानें आपणास अंगीकार करून त्यांतच धन्यता मानावयाची आणि दुसरीकडे कुठें दृष्टिहि वळवावयाची नाहीं, असा कांहीं भाव तिच्या चेहऱ्यावर उमटलेला दिसत होता.

मी म्हटलें, " बरं मग आतां ? "

" आतां ? आतां काय तुझं लग्न आहे ना ? "

" होय, आहे ! माझंच लग्न आहे हें तुला माहीत होतं ? "

" नाहीं, तें माहीत नव्हतं. राजनंदिनीचं लग्न आहे हें माहीत होतं. पण तेंच तुझंहि लग्न आहे हें माहीत असतं तर इथं राहिलें असतें का ? "

" कां – न रहायला काय झालं ? "

" मी अपशकुनी आहे ना बाबा ! आम्हीं असलों म्हणजे एखादं काम होत असेल तर त्यांत बिघाड व्हायचा ! अजूनहि मी विचार करत्यें कीं कुठं तरी निघून जावं कीं काय ! पण एक गोष्ट मात्र तुला सांगून ठेवतें. आज माझ्याकडे आलास तें ठीक आहे, पण पुन्हां येऊं नको. असला मूर्खपणा इथं करूं नको ! माझं कुलशील कुणाला ठाऊक आहे ? तेव्हां माझ्याकडे येणंजाणं बरं नाहीं. आणखी हें पहा, कांहींहि झालं तरी हें लग्न नीट पार पडलं पाहिजे. मुलगी माझ्या चांगली माहितीची आहे. दिसायला सुरेख आहे आणि स्वभावानं फार चांगली आहे. "

मी मध्येंच म्हटलें, " मग तुझ्या मतें इथलं निश्चित ठरवावं तर ? "

" अवश्य. "

" बरं आहे, ठरवितों. आतांपर्यंत निराळाच विचार होता. आतां वाटूं लागलं आहे कीं एकदां सांगून टाकावं ही माझी आत्या आहे म्हणून. "

दोन्हीं कानावर हात ठेवून ती एकदम म्हणाली, " नको रे बाबा, भलतंच कांहीं करूं नको— "

मी म्हटलें, " असली फसवणूक मी करूं इच्छित नाहीं—लग्नाच्या बाबतींत तर नाहींच नाहीं ! जन्माच्या गांठीं आहेत या. तिथं खोटं बोलून कसं भागेल ? "

" बाबारे, आज तरी मी तुझी कोणी आहे हेंच खोटं आहे. सांग आज मी तुझी कोणीतरी लागते का ? मी तुझी आत्या आहे हें एकेकाळीं खरं असेल. पण तें नातं मी आपल्या हातानें तोडून धुळींत फेकून दिलं आहे. त्याचा निर्जीव सांपळा धुळींतून उचलून त्याला तूं सत्य म्हणूं पहातोस हेंच खोटं आहे ! प्रमोद, मी तुला सांगतें तूं माझ्या नादीं लागूं नको. माझं नशीब माझ्याबरोबर. जा, जा, आतां क्षणभर इथं थांबूं नको. जास्त वेळ थांबलास तर परिणाम वाईट होईल ! "

आणि त्यावेळीं खरोखर मलाहि मनांत वाटत होतें कीं येथें फार वेळ बसणें योग्य नाहीं; लोक काय म्हणतील ? आतां मला या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटतें. ' लोक काय

म्हणतील ' ही भीति उराशीं बाळगून आपण आपला धोपट मार्ग सोडून देऊन विनाकारण आडमार्गानें कां जातो ? लोकांना काय, देवानें तोंड दिलें आहे, ते आपापल्या कल्पनें-प्रमाणें कांहींतरी बोलणारच ! त्यांत त्यांचा काय दोष ? त्याबद्दल कोण काय बोलूं शकणार ? परंतु त्याची भीति मनांत बाळगून आपल्या सदसद्विवेकबुद्धीला पटत असलेली गोष्ट मनुष्य बाजूला सारतो. काय हा मूर्खपणा !

मला तिथें आल्याला दोन दिवस झाले. तेवढ्या वेळांत मास्तरीणबाईशीं माझा परिचय झाला आहे व तो वाढत आहे हें सर्वांच्या लक्षांत आलें. अर्थात् त्याकडे कोणी विशेष लक्ष दिलें नाहीं. उलट मास्तरीणबाई सर्वांना इतक्या प्रिय होत्या कीं मी त्यांच्याकडे जातों ही गोष्ट त्यांना आवडली असावी. ते दिवस फार आनंदांत गेले. आत्याबद्दलची माझी एक काळजी कांहींशी दूर झाली. तिला पोटापुरतें मिळत आहे, चार लोक तिची चौकशी करणारे आहेत—चला, तेवढंच ! माझ्यावरहि सर्व खूष होते असें दिसलें. तेथील पोराबाळांशीं माझी खूप गट्टी झाली होती. माझ्या मेव्हणेमेव्हण्या मला नव्या नात्यानें हांक मारूं लागल्या होत्या. राजनंदिनी एकदोन वेळां माझ्यासमोर आली, पण मला पाहिल्याबरोबर इतकी लाजली कीं क्षणभरहि समोर उभी न राहतां आंत पळून गेली. वाङ्निश्चय विधिपूर्वक पार पडला. तरी माझ्या मनाला मोकळेपणा वाटत नव्हता. माझें मन मला खात होतें, कीं आपण यांच्यापासून कांहीं

तरी चोरून ठेवीत आहों ! हें मनावरचें दडपण शेवटीं इतकं असह्य झालें कीं जेव्हां तेथून जाण्याची वेळ आली तेव्हां डॉक्टरसाहेबांना सरळ सांगून टाकलें कीं मास्तरीणबाई माझी आत्या लागते !

हें ऐकून त्यांना कांहीं वाटल्यासारखें दिसलें नाहीं. कांहींशा कुतूहलापलीकडे त्यांच्या चेहऱ्यावर कांहीं भाव उमटला नाहीं. मी त्यांना सगळी हकीकत सांगितली. शेवटीं 'कांहीं झालं तरी मी तिला आपली आत्या म्हणून मानतों आणि मानणार; या सर्व गोष्टींचा विचार करा' असें सांगून मोकळा झालों !

डॉक्टरसाहेब माझ्याकडे कुतूहलानें पाहूं लागले. ते म्हणाले, "मग असेना ! त्यांत काय बिघडलं ? त्यांत मोठं विचार करण्यासारखं काय आहे ? आय् हॅव्ह यू. व्हॉट मोअर डू आय वॉण्ट ?"

मला खरोखर उगाच आपल्या मनांत चाललेल्या द्वंद्वाची लाज वाटूं लागली. मी मोठ्या आनंदानें तेथून निघालों. जातां जातां राजनंदिनीनेंहि एक गुप्त भेट आणि आपला अनन्य विश्वास देऊन मला कृतार्थ केलें.

परंतु विधिलीला विचित्र आहे ! परिस्थितिची एक जोराची लाट उसळली व मी तिला अडवूं शकलों नाहीं. लग्न मोडलें ! राजनंदिनीची आई—आमच्या भावी सासूबाई—या गोष्टीच्या अगदीं विरुद्ध होत्या आणि इतर नात्यागोत्यांतील मंडळींनाहि

ती आपत्ति वाटली ! डॉक्टरसाहेबांना मात्र लग्न मोडल्याचें फार वाईट वाटलें. त्यांचा माझा स्नेहसंबंध शेवटपर्यंत टिकून राहिला आणि ते पत्रांत मला नेहमीं आपला मुलगा म्हणून संबोधीत असत. राजनंदिनीचें पुढें दुसऱ्याशीं लग्न झालें. त्यावेळीं त्यांनीं तीव्र नापसंती व्यक्त केली आणि पुढें त्याचा कांहींतरी वाईट परिणामहि झाला असें ऐकलें. तें असो म्हणा, आपली बायको आणि इतर नातलग यांच्यापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं एवढें खरें.

तें झालेंच आणि शिवाय आत्याबाईलाहि तेथल्या नोकरीवर राहूं दिलें नाहीं ! शिकवणी अर्थात्‌च बंद झाली.

ही बातमी ऐकल्याबरोबर मला काळजी उत्पन्न झाली. पत्र लिहिलें, तार करून पाहिली. स्वतः जातां आलें नाहीं. तें पत्र आणि तार कुठें जाऊन पडलीं असतील देव जाणे ! एवढंच कळलें कीं आत्याबाई तेथून कुठें तरी निघून गेली. कुठें गेली असेल राम जाणे ! जगाच्या पाठीवर अशी कुठें जागा होती कीं जिथें जाऊन ती हक्कानें राहूं शकेल ? अशी एकहि जागा नाहीं ! म्हणूनच वास्तविक तिला जगांत सगळ्याच जागा आपल्या होत्या, सगळें सारखेंच होतें !

---



पुष्कळ झालें—आतां पुरें करतों. आयुष्य म्हणजे एक कहाणीच आहे, आणि आत्याबाईच्या या कहाणींत आतां काय जीव राहिला आहे ?

घटना घडत जातात, घडून समाप्त होतात. आपण जगतों, आणि जगतां जगतां एक दिवस मरतों. जीवनाला आरंभ किती उत्साहानें करतों ! आणि जीवनाच्या पैलतीराला पोंचतांना मन किती वैतागून जातें ! या लीलेबद्दल, या कोड्याबद्दल मी विचार करीत राहतों. त्याचा अंत लागत नाहीं, रहस्य उलगडत नाहीं.

अथांग सागर आहे. आपण आपल्या लहान लहान कागदाच्या होड्या घेऊन खेळण्यासाठीं किनाऱ्यावर आलों आहों. परंतु कांठाजवळ आहों तोंवर ठीक आहे, पुढें ठाव नाहीं. आपल्यापैकीं जास्त धीट असणारे पुढेंहि जातात. कांहींजण

बुडतात, कांहीं पाहतांनाहि दिसतात. पण बाकीं बहुतेकांची कांठावरच श्वास घेण्यापुरती जागा मिळविण्यासाठीं धडपड चाललेली असते. त्यांनीं तरी काय करावें ? बिचारे आपापल्या छोट्या क्षेत्राच्या परीघामध्यें घोळ घालीत राहतात आणि कसे-बसे जगतात. समुद्र तीन्हीं बाजूला किती उत्साहानें तांडव करीत आहे ! — चालूं द्या त्याचें तांडव. आम्हांला आमची कामें आहेत. त्याच्याकडे दृष्टि वळविण्यास आम्हांला वेळ कुठें आहे ?

बाकी त्याच्याकडे दृष्टि टाकणार कशी ? त्या सागराच्या लाटांना अन्त कुठें आहे ? पैलतीर कुठें आहे ? त्याला पार नाहीं, किनारा नाहीं, कांहींच नाहीं ! दृष्टि ठरणार तरी कशावर ? आकाश आणि समुद्र यांना एक करणारी क्षितिजाची कोर मात्र दिसत आहे. तेथेंहि निळा निळा अंधार आहे — सीमारेषा नाहींच ! असलीच तर आपल्या दृष्टीचीच सीमा आहे; एरव्ही तेथें जाऊन पहावें तर तीच असीम विस्तीर्णता !

ओः ! नकोच तें पुढें जाणें ! तिथें ठाव लागणार नाहीं. जळ दुस्तर आहे. तिथें बोलायला चालायला कोण आहे ? आपले, परके, जे आहेत ते सर्व इथेंच किनाऱ्याजवळ आहेत. तिथें सर्व भयंकर शांतता पसरलेली आहे. नको, नको, पुढें जाणें नको !

किनाऱ्यावरच राहूं या — इथें पाय तरी जमिनीला लाग-तात. आपल्या पायाचा नांगर जिथें जमीनीला घट्ट धरूं शकतो

तिथेंच उभे राहूं या. बस, बस ! इथून मधून मधून साग- राच्या अफाट विस्ताराकडे आपण नुसती दृष्टि फेंकतों हें काय कमी आहे ? खरोखरच हेंहि पुष्कळच आहे. तेवढ्यानेंहि हृदयाचा थरकांप होतो; मन बावरतें आणि डोकें गरगरूं लागतें, – सहन होत नाहीं ! असो. सोसवेल इतकाच त्या विराट स्वरूपाकडे दृष्टिक्षेप करावा, आणि ठाव लागेल अशा बेतानें आपले कांठाकांठावरच सर्वांशीं हंसत खेळत डुंबत राहावें हें बरें ! या शिवाय दुसरा उपाय नाहीं. मानवी जीवन हें असेंच आहे !

....अरे ही आत्याबाई हात पुढें करून या खोल पाण्यांत कां उतरली ? तेथें पाय टेकायला जागाहि नाहीं. हें भलतें साहस ती कां करीत आहे ? मी किनाऱ्यावरूनच ओरडलों—

" अग इकडे ये ! मी इथं आहे ! मी कोण आहे पाहिलंस कां ? तुझा भाचा, प्रमोद आहे मी ! तुझा लाडका भाचा ! इकडे ये इकडे ! इथं तुला आम्हीं सगळे भेटूं. इथं चांगली टणक जमीन आहे. कांहीं कशाचा त्रास नाहीं; सर्व सुरक्षितता आहे, निश्चिंति आहे; लाटांची भीति नाहीं. ये इकडे, इथं कोरडी जमीन आहे ! "

आत्याबाई खोलखोल उतरत चालली होती. पोहायला तरी कुठें शिकली होती ? आणि तिथें पोहणाऱ्याची तरी काय पुढें जाण्याची छाती होती ? तिथें दम छाटणें कठीण होतें. आत्या- बाईनें तेथूनच उत्तर दिलें—

" छे: प्रमोद, तें अशक्य आहे ! तूं माझा प्रमोदच आहेस— मी तुला विसरेन का ? परंतु एकदां किनारा सुटला तो सुटला. समज आतां इथं थकलें आणि बुडालें तरी बिघडलं कुठं ? नाहींतरी शेवटीं आपण सगळेच या समुद्राच्या पोटांत गडप होणार आहों ना ? प्रमोद, तुला समजत नाहीं. जिथें पाय लागत नाहीं, तिथंच मनुष्य पोहूं शकतो. पोहल्याशिवाय मला गत्यंतर नाहीं ! एकदां अथांग सागरांत उडी घेतल्यानंतर परत फिरूं ? इतकी मी कमनशिबी होऊं इच्छित नाहीं ! "

मी तिच्याकडे दोरी फेंकली. ती धरण्याऐवजीं ती नुसती हसली. आणि म्हणाली, " प्रमोद, फार आभारी आहे मी ! "

मी ओरडून म्हणालों, " तुला माझ्याबद्दल कांहीं प्रेम वाटत नाहीं ! असेल तर परत ये ! "

खोलखोल उतरत तिनें उत्तर दिलें, " माझं तुझ्यावर अतिशय प्रेम आहे. आणि म्हणूनच मी तुला माझ्याकडे बोलावीत नाहीं. मी तर परत येऊं शकतच नाहीं. पहा, केवढा समुद्र पुढें पसरला आहे ! तो सगळा पार करायचा आहे ना ? "

मी रागावून ओरडलों, " जा तर ! मी तुझ्याकडे पाहणारच नाहीं ! "

ती म्हणाली, " नकोच पाहूं ! पहात राहिलास तर तुझेच पाय जमिनीवरून सुटण्याची भीति आहे. "

मी ओरडून म्हटलें, " जा, मर बुडून ! "

ती हंसून म्हणाली, " बुडून मरणंहि वाटतं तितकं सोपं नाहीं बाबा ! अजून किती टक्केटोणपे खायचे शिल्लक आहेत कुणास ठाऊक ! त्या टक्क्याटोणप्यापासून तूं दूर आहेस एवढेंच समाधान आहे ! माझें तुझ्यावर प्रेम आहे, म्हणूनच सांगतें."

शेवटच्या खेपेस जेव्हां मी तिला भेटलों त्यावेळीं मी वकील झालों होतों. तिची स्थिति अत्यंत शोचनीय झाली होती. ती आजारी असून एका लहानशा खोलींत एकटीच पडली होती. औषधपथ्याची कांहीं व्यवस्था नव्हती. आजूबाजूच्या लोकांना तिच्याबद्दल सहानुभूति होती, परंतु ते लोक अशा प्रकारचे होते कीं ज्यांच्या सहानुभूतीची किंमत आर्थिक दृष्ट्या शून्य होती. या खेपेस आश्चर्याची गोष्ट अशी कीं तिनें मला आपण-हून पत्र लिहिलें होतें. मध्यंतरीं आई वारली. तिला बातमी उशीरा लागली, पण लागल्याबरोबर तिनें मला पत्र लिहिलें. तें पत्र मी किती वेळां वाचलें असेल ! एकदां वाचावें, वाचून विचार करीत बसावें; पुन्हां वाचावें, पुन्हां विचार – पण नाहीं, विचारच करायचा नाहीं आतां ! तें सगळें विसरूं या. तिनें लिहिलें होतें —

" प्रमोद, आई असणें ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. मी तर जन्माची दुर्दैवी ठरलें. मला वाईट इतकेंच वाटतें कीं मी त्या स्वर्गस्थ देवतेची कधींच सेवा करूं शकलें नाहीं. ती जिवंत असतांनाच एकदां तिची क्षमा मागावी अशी माझी इच्छा होती. पण तें व्हायचें नव्हतें. असो. आपल्या नशीबाचा दोष दुसऱ्या कुणास लावणार ?

प्रमोद, तूं रागावशील, म्हणून मी वरती आपला पत्ताहि दिला आहे. तूं येशील हें मी ओळखून आहे. माझ्या पूर्वीच्या गांवींहि तूं चौकशी केली असशील हें मला ठाऊक आहे. तूं तारापत्रें कशाला पाठविलींस ? फुकट ! माझा नाद सोडून दे. प्रमोद, जीवन ही एक परीक्षा आहे. निदान माझ्या बाबतींत मीं तें तसेंच केलें आहे. तुला यायचें असेल तर ये. परंतु माझ्याकडून मात्र कसलीहि अपेक्षा करूं नको. ज्या लोकांमध्यें मी रहात आहे ते लोक म्हणजे समाजाचें उच्छिष्ट आहेत, चोथा आहेत आणि कदाचित् ते उच्छिष्ट होण्याच्याच लायकीचे असतील. परंतु कसें झालें तरी तीं माणसें आहेत ! आणि ही गोष्ट या लोकांमध्यें येऊन पडलें तेव्हांपासून मला स्पष्ट दिसत आहे. मी आतां जिवंत राहूं इच्छितें, ती दुसऱ्या कशाच्या आधारावर नाहीं, तर केवळ या लोकांमध्यें अद्याप मधून मधून विझूं पाहणारी आणि जागृत होणारी जी माणुसकीची ज्योत आहे, तिच्या भरंवशावर. दारोदार भटकून मी इतकेंच शिकलें कीं या दुर्जन लोकांच्या सद्भावनेव्यतिरिक्त माझ्याजवळ दुसरें भांडवल नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि गोष्टींच्या आधारावर जगण्याची इच्छाच माझ्यांत राहिली नाहीं. माझा अनुभव असा आहे कीं ज्या या लोकांना आपण दुर्जन म्हणतों त्यांच्या अंतःकरणांत खोल कुठें तरी असा एक थर सांपडेल कीं ज्याला स्पर्श केल्याबरोबर तेथून सद्भावनेचा दुधासारखा शुभ्र आणि स्वच्छ झरा फुटून निघेल ! यामुळेंच सर्वांच्या हृदयांत परमात्मा आहे याची मला

आतां सहज प्रतीति येऊं लागली आहे. तो सर्वांतर्यामी आहे, सर्वव्यापी आहे. म्हणूनच येथून आतां दुसरीकडे जाण्याची माझी इच्छा नाहीं. कशाला जायचें ? इथें सर्व कांहीं आहेच !

तूं विचारशील, 'इथं राहण्यांत फायदा काय ?' फायदा पुष्कळ आहे. इथें मी सदाचरणी आहे असें म्हणण्याचा कोणालाहि मोह होणें शक्य नाहीं. इथें सदाचरणाच्या प्रमाणानें मनुष्याचें मूल्य ठरविलें जात नाहीं. किंबहुना दुराचरण हेंच इथें मूल्याचें माप आहे. मनुष्याची कमीअधिक योग्यता इथं याच हिशेबानें ठरविली जाते. मला वाटतें हाच इथला खरा रोग आहे; हें अज्ञान भयंकर आहे. परंतु त्याचाहि उपयोग आहे. इथें स्वतःला सदाचरणी म्हणवून कोणी मिरवील, मिरवूं इच्छील किंवा मिरवूं शकेल हें शक्यच नाहीं. सदाचरणाला इथें कांहीं किंमत नाहीं, त्याची कांहीं अपेक्षाहि नाहीं. उलट त्याला असलें तर उणें मूल्य आहे. एखाद्याच्या अंतःकरणांत जर खोल कुठेंतरी दडून बसलेला पशुतेचा किडा असेल, तो इथें झटकन् वर येईल. सभ्य समाजांत जो दिखाऊपणा आवश्यक असतो, तो इथें सांपडावयाचा नाहीं. इथें शिष्टाचाराची, सभ्यतेची अपेक्षा नाहीं. निःसंकोचीपणा जितक्या उघडपणें प्रकट होईल तितका त्याला जास्त रंग चढेल ! रानटीपणाला लज्जेचें आवरण पाहिजे कशाला ? इथें मनुष्य उघडपणें पशु होऊं शकतो; आणि जर झाला नाहीं तर त्याच्या मनुष्यत्त्वास बट्टा लागल्यासारखें होतें ! म्हणून केवळ सदाचरणी दिसणारा मनुष्य इथें टिकूं शकणार नाहीं. सदा-

चरणी असला तर हाडाचा सदाचरणी पाहिजे, तरच टिकेल. जसा आंत तसा बाहेर पाहिजे. आंत पशु असेल तर या वातावरणांत नुसती बाहेरची माणुसकी क्षणभर टिकणार नाहीं! माणुसकी असली तर आंत बाहेर सगळी माणुसकी पाहिजे. सदाचरणाची नुसती झिलई असेल तर इथें उघडकीस आल्याशिवाय राहणार नाहीं. इथें शंभर नंबरी सोनेंच टिकेल; कारण खरोखर खऱ्या सोन्याला मी पितळ नाहीं हें सांगावें लागतच नाहीं! इथें सोन्याला मागणी नाहीं, कीं पितळाला कोणी भीत नाहीं! म्हणून आंत पितळ घालून बाहेर सोनें दाखविण्याचा मोह इथें क्षणभरहि टिकणार नाहीं. इथें असली तर पितळालाच किंमत आहे. म्हणून सोन्याच्या धैर्याची इथें परीक्षा होते; खऱ्या सोन्याची पुरती पारख इथेंच होते. ही इथली कसोटी आहे. जो या कसोटीवर खरा ठरेल तोच खरा असें मी समजतें. तोच परमेश्वराचा लाडका होऊं शकतो.

प्रमोद, तुला कसं सांगूं — पण तूं आला नाहींस तरच बरें! तुझें अंतःकरण कोमल आहे, तूं उच्च विचारांच्या वातावरणांत वावरत आहेस. इथें कोमलता कुठली अन् उच्चता कुठली? इथें सगळी घाण आहे, अज्ञान आहे. मी या वातावरणांत श्वास घेऊं शकेन, कारण मला त्याची संवय झाली आहे. कदाचित् माझ्या मनांतील कोमल व उच्च वृत्ती मंदावल्या असतील. कसेंहि असो, तूं न आलास तर बरें! तुझें प्रेम गमावून बसणें मला असह्य होईल. उच्चवर्गांत आतां कोणाला

मी ओळखीत असेन तर तुला एकट्याला! मलाहि आतां कोणी ओळखीत नाहीं. पण उच्चवर्गाबद्दल माझ्या मनांत अद्याप अप्रीति उत्पन्न झाली नाहीं याचें कारण तूंच! प्रमोद, तुला कल्पना नसेल, अजाणतां तूं माझ्यावर हा केवढा उपकार करीत आहेस! ज्या समाजांत तूं राहतोस त्या समाजाबद्दल, तूं त्यांतला एक घटक असेपर्यंत, मला तिरस्कार कधींतरी वाटेल का? कधीं कधीं तो तिरस्कार मनांत उसळून येतो, परंतु तुझ्या प्रेमाची आठवण झाल्याबरोबर माझें हृदय निवतें, आणि मनांतील कटु भावना माझ्या स्वास्थ्याचा भंग करूं शकत नाहीं. कटुता येते परंतु तुझ्या आठवणीच्या स्पर्शानें मी तिचें बलांत रूपांतर करून टाकतें. तुझें प्रेम मला निर्मळ ठेवतें. परंतु मला भीति अशी वाटतें कीं तूं इथें यावास आणि तुझ्याबद्दलचें उरलेंसुरलें प्रेमहि माझ्या हातून निसटून जावें! असें झालें तर माझी काय स्थिति होईल? मला जगणें अशक्य होईल; माझें बल नष्ट होईल. श्रद्धा तरी टिकणार कशाच्या आधारावर? मग मात्र माझ्या जीवनांत सर्वत्र अपवित्रता, घाण पसरेल! असें झालें तर हें जीवन कोणत्या सूत्राच्या आधारा-वर टिकणार? सध्यां निदान मधून मधून मन उच्च वातावरणांत नेऊन स्वच्छ हवा फुप्फुसांत खूप भरून घेतें आणि या विषारी वातावरणांत सहज जगूं शकतें. तें जमेनासें झालें म्हणजे जगणार कशी? मरण येईल याबद्दल वाईट वाटत नाहीं. परंतु जीवनावरची माझी पकड नाहींशी होईल ही मोठी

भीति आहे. जीवनाबद्दलची श्रद्धाच नाहींशी झाली म्हणजे राहिलें काय ? श्रद्धा कायम असतांना मरण्यांतच खरें सार्थक आहे ! म्हणून म्हणतें तूं दूरच रहा, इकडे येऊं नको. मी राहत असलेलें ठिकाण तुला पाहण्यायोग्य नाहीं. आणि तुझ्याच भरंवशावर मी इथली असून इथली नाहीं आहे ! म्हणून तुला पुन्हां बजावून सांगतें, तूं इकडे येऊं नको. आलास तर—तर तूंच पहा !

इतकें मोठें पत्र कसें लिहिलें आणि कां लिहिलें तेंच मला कळत नाहीं. एवढं खरें कीं तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाहि या गोष्टी सांगूं शकलें नसतें. आणि त्यांचा विचार करून त्या पूर्णपणें समजल्याहि नसत्या.

प्रमोद, मदतीसाठीं तुला मी कधींच हांक मारणार नाहीं असें मात्र समजूं नकोस. माझ्या हृदयांतील श्रद्धा ज्यावेळीं मंदावेल त्या वेळीं तुला अवश्य बोलावीन. या भरंवशावर तूं आतांच माझ्याकडे येऊं नको — मी तुला सांगून ठेवतें —"

बस, आतां मी पुरें करतों. किती जीवाला त्रास करून घ्यायचा ? ज्या ठिकाणीं व ज्या अवस्थेंत आत्याबाई मला भेटली, त्याचे वर्णन करणें अशक्य आहे ! आत्याबाईच्या पत्रावरून त्याची किंचित् सुद्धां कल्पना येऊं शकणार नाहीं. गांवातील अत्यंत गलिच्छ वस्तींत ती राहत होती. प्रौढवयस्क वेश्या, बेकार मजूर, धंदेवाईक भिकारी, कायद्याचा डोळा आणि पकड चुकवून गुप्तपणें किंवा उघडपणें घाणेरडीं कृत्यें करणारे मवाली,

असल्या लोकांची ती वस्ती होती. आत्याबाई इथें कुठें येऊन पडली ? ती आजारी होती, व एका मोडक्यातोडक्या खाटेवर पडली होती. वर सांगितल्यापैकीं चार पांच लोक तिच्या भोंवतीं बसले होते. त्यांच्या चेहऱ्यांवर आत्याबाईच्या आजारी-बद्दलची कळकळ आणि चिन्ता दिसत होती. त्यांना त्याचें वाईट वाटत असावें असें दिसलें. परंतु ते ज्या गोष्टी बोलत होते त्या इतक्या बेपर्वाईनें आणि उघडपणें बोलत होते कीं मला त्याची शिसारी आली.आत्याबाईबद्दल त्यांचा आदरभाव प्रकट होत असला तरी तिचा ते एकेरी नांवानेंच उल्लेख करीत होतें ! तेथें म्हणजे कसलीच लाजलज्जा नव्हती आणि आत्या-बाईच्या खाटेभोंवती बसल्या बसल्या त्या लोकांच्या आपसांत घाणेरड्या कोट्या व खुणा चालल्याच होत्या. माझ्यासारखा अपरिचित मनुष्य आंत आल्याबरोबर त्यांना आनंद झाल्या-सारखें दिसलें नाहीं. जणू कांहीं मी कुणी अविश्वसनीय, भया-वह, असा वेगळ्याच जगांतील प्राणी आहे ! मला पाहिल्या-बरोबर त्यांपैकीं बहुतेकांची खात्री झाली कीं आपल्या या आजारी बाईचा हा कुणीतरी प्रियकर असून तिच्या या अव-स्थेला हाच जबाबदार असला पाहिजे. आणि ही गोष्ट त्यांनीं इतक्या उघडपणें बोलून दाखविली कीं मी सर्दच झालों !

आत्याबाई सर्व ऐकत होती आणि मुकाट्यानें सहन करीत होती. मधून मधून एखाद्याला अभद्र बोलल्याबद्दल रागावीतहि

होती आणि त्या रागावण्याचा परिणामहि होत होता असें दिसलें. परंतु सामान्यतः ती त्याबद्दल उदासीनच रहात होती.

मी म्हटलें, " आत्याबाई, आतां चल माझ्याबरोबर. मी तुला न्यायला आलों आहे. "

" कुठें घेऊन जाणार आहेस ? "

" आतां माझं स्वतःचं घर झालं आहे आत्याबाई ! लग्न करून संसार थाटला आहे. आतां घरांत माझीच हुकमत आहे. तिसरं तिथं कोणी नाहीं. चल, आतां तिथं तुझंच राज्य होईल ! "

" या वयांत आतां कुठं येऊं ? "

" या वयांत ? या वयांत तुला सुख देऊं शकलों नाहीं तर देणार तरी केव्हां ? मला कांहीं माहीत नाहीं – तुला मी एकदां सांगतों तुला आलं पाहिजे ! माझी वकीलीसुद्धां आतां चांगली चालत आहे. कांहीं काळजी नाहीं बरं आत्याबाई ! मोठे मोठे अधिकारी माझे मित्र होताहेत. मला कोणाची पर्वा नाहीं. तूं चल आपली ! "

आत्याबाई मुकाट्यानें ऐकत राहिली. नंतर म्हणाली —

" प्रमोद, तूं महाभारत वाचलं आहेस ना ? युधिष्ठिर स्वर्गाला गेला तेव्हां आपल्या कुत्र्याला सोडून नाहीं गेला. मला सांग तुझं घर किती मोठं आहे ? या सर्वांना घेऊन चलणार आहेस ? हे तर कुत्रेहि नाहींत, माणसासारखीं माणसें आहेत; आणि यांचे माझ्यावर फार मोठे उपकार आहेत ! "

मी चमकलों. तरी जरा सांवरून म्हणालों, " काय वेड्या-सारखं बोलतेस तूं आत्याबाई ! म्हणजे शेवटीं मी तुझा कोणीच नाहीं ना ? बरं, बघशील तुला घेऊन जातों कीं नाहीं तें ! "

आत्याबाईनें स्मित करून शांतपणें उत्तर दिलें, " मी कुठें नाहीं म्हटलें बाबा ! बरं, तूं मला घेऊन जाणारच म्हणतोस ? "

" हो तर ! मघांपासून सांगतोय् ना ? "

" बरं, तुझ्याजवळ पैसे किती आहेत तें तर सांग ! पुष्कळ असतील नाहीं ? "

मी आश्चर्यानें विचारलें, " पैसे ? "

" हं. तुला देतां येतील तितके पैसे मला देऊन जा. म्हणजे मी तुझ्या घरीं आल्यासारखंच झालं ! झालं कीं नाहीं ? सांग ना — "

मी आश्चर्यानें तिच्याकडे बघत राहिलों. कांहींतरी बोलायचें म्हणून बोललों —

" पैशाचं काय करणार आहेस ? "

" काय करणार – तें आतांच नाहीं सांगतां येत. पण आधीं मी तुझ्याकडून मदत घेऊं इच्छित नाहीं हा जो तुझा गैरसमज झाला आहे तो तरी दूर होईल. खूप मिळव आणि इथं या खड्ड्यांत आणून टाक. ऐकलंस ? पैशाच्या जोरावर या नरककुंडाचा स्वर्ग होईल असं माझं म्हणणं नाहीं. तरी पण पैशाचा केव्हां ना केव्हां तरी उपयोग होईलच कीं ! "

तिच्या बोलण्याचा आशय माझ्या लक्षांत आला नाहीं. मी तो विषयच टाळला आणि म्हटलें —

" चल, निदान तुला हॉस्पिटलमध्यें ठेवतों. "

तिनें शांतपणें उत्तर दिलें, " मी जें तुला सांगितलं तें तुझ्या लक्षांत आलेलं दिसत नाहीं. बरं जाऊं दे. बाबारे, हॉस्पिटल-मध्यें जाऊन काय करूं ? "

" तिथं व्यवस्था तरी चांगली होईल. प्रायव्हेट वॉर्डमध्यें ठेवीन. खर्चाची तूं काळजी करूं नको, आत्याबाई – "

ती मध्येंच म्हणाली –

" काळजी करूं नको म्हणजे काय, प्रमोद ? काळजी आहेच ! तूं पुष्कळ पैसे देशील, म्हणून कांहीं मी इथून उठून जाऊन प्रायव्हेट वॉर्डमध्यें पडूं कीं काय ? प्रमोद, देह आहे तोंपर्यंत दुखणीं पाठीस लागलींच आहेत ! त्यांत एवढं घाबरायचं काय ? "

उगाच लांबण लावण्यांत काय अर्थ आहे ? त्यानें माझी दुर्बलता मात्र दिसून येईल ! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मी तिला बरोबर नेऊं शकलों नाहीं, कीं कांहीं करूं शकलों नाहीं. पथ्यपाण्याची तरी कांहीं व्यवस्था करूं शकलों म्हणाल, तर तेंहि नाहीं ! एवढेंच केलें कीं, एका स्थानिक वकील मित्रा-जवळ कांहींतरी शंभर दोनशें रुपये देऊन ठेवले आणि त्याला लक्ष ठेवावयास सांगितलें. त्यानें लक्ष ठेवलंच असेल, पैसेहि

खर्च केले असतील; अर्थात् हे सर्व जितक्याचें तितक्यापुरतेंच केलें असेल हेंहि तितकेंच खरें आहे.

परिणाम असा झाला कीं, मला अत्यंत वाईट वाटलें, मी तिला टाकूनहि बोललों आणि तऱ्हेतऱ्हेच्या ताकीदी देऊन आणि उपदेशाच्या गोष्टी सांगून तेथून निघून आलों!

आणि जो एकदां आलों तों पुन्हां म्हणून तिकडे गेलों नाहीं. आणि त्यानंतर माझ्या वकिलीमध्यें इतका गढून गेलों कीं इकडे तिकडे कुठें पाहिलें नाहीं – आपला स्वार्थ आणि पैसा, बस्स दुसरें कांहीं नाहीं!

पण असें कां? आत्याबाईची मागणी मी कां पुरी केली नाहीं? तिनें माझ्यावर इतकें प्रेम केलें, इतका विश्वास दाखविला, परंतु तिने जेव्हां एक लहानशीच मागणी केली, तेव्हां तिच्यावरून पैसा ओवाळून टाकणें माझ्यानें झालें नाहीं! कां? त्यावेळीं माझी मूठ घट्ट मिटून कां राहिली? बरें झालें तें झालें, त्यानंतर तरी त्याबद्दल जीवाला कांहीं पश्चात्ताप व्हावा! तेंहि नाहीं? कां? कां?

—या 'कां' चें उत्तर आतां देतों. उत्तर असें कीं–मी क्षुद्र होतों!

—वकीलींत डोकें खुपसून मोठेपणा मिळविण्यांत कां दंग राहिलों? आपलें सर्व ठीक चाललें आहे असें कां समजत आलों? कर्तव्य बाजूला सारून अकर्तव्य कां करीत राहिलों? –

—उत्तर असें आहे कीं—मी बुद्धिमान् होतो, मूर्ख नव्हतों ! तराजू हातांत ठेवून प्रत्येक गोष्ट तोलीत राहिलों !

— म्हणूनच आज जो खरा तराजू आहे त्यांमध्ये मी हलका भरत आहे. आज या माझ्या वकीलीच्या व बुद्धिमत्तेच्या प्रतिष्ठे-वर उच्चस्थानीं बसल्या बसल्या विचार करतों कीं, परमेश्वरानें मला किंचित् मूर्ख कां नाहीं केलें ? हा सगळा पैसा आणि ही प्रतिष्ठा – यांना पाठीवर बांधून कुठें घेऊन जाऊं ? प्रेमाची परत-फेड करण्याची संधि आली असतां ती मी गमावली – आतां या सर्वांचें काय करूं ? हें सर्व जें मी गोळा केलें आहे तो मल आहे-माझ्या आत्म्याला झांकून टाकणारी ती घाण आहे ! मला तें कांहीं नको आहे !

—— या गोष्टीला आज सतरा अठरा वर्षें होऊन गेलीं. या सतरा अठरा वर्षांत् मी एकदांहि आत्याबाईला भेटलों नाहीं. इतकी माणुसकी माझ्यांत राहिली नाहीं याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें आणि माझा मलाच संताप येतो ! माझी आत्याबाई ! —— जिनें जन्मभर केवळ दिलें, घेतलें नाहींच ! – जिनें कांहीं केलें असेल तर माझ्यावर प्रेमच केलें; जिचें जीवन – कसेंहि असो – दिव्याच्या ज्योतीप्रमाणें तेवत राहिलें; धूर निघाला तरी ज्योत तशीच तेवत राहिली ! तिची आठवण निखाऱ्याप्रमाणें माझें हृदय भाजून काढीत आहे ! त्याच माझ्या आत्याबाईला एका कोपऱ्यांत ढकलून मी आत्मवंचना कसा करीत राहिलों ?

—आजच कळलें कीं ती मेली ! कशाने मेली – तें समजून तरी काय करावयाचें आहे ? जें आतांपर्यंत समजलें तें काय कमी आहे ? तेवढेंच जरी पचविलें तरी मी म्हणतो माझें सार्थक झालें ! —

— आत्याबाई, तूं गेलीस ! तूं जिवंत असतांना मला योग्य मार्ग कधींच दिसला नाहीं. आतां ऐक, ही न्यायाधिशाची जागा मी आज सोडीत आहें ! त्याबरोबर जगांतील लौकिक उपचारांनाहि रजा देणार आहें. केवळ दुसऱ्यासाठीं जगायचें हें आतां नव्यानें शिकणें मला शक्य नाहीं; संवयी पक्क्या झाल्या आहेत. परंतु एवढें वचन देतों कीं, स्वतः मात्र केवळ जगण्याकरितां आवश्यक असेल इतक्याच स्वल्पतेनें जीवन व्यतीत करीन !

— परमेश्वरा, तूं माझें बोलणें ऐकत आहेस. एरव्हीं जरी नाहीं, तरी हें वचन मोडलें तर तूं मला अवश्य नरकवास दे !

( सही ). **पी. दयाल.**

ता. ३-४-

ता. क. – याचबरोबर आपल्या न्यायाधीशाच्या जागेचेंहि मी त्यागपत्र (राजीनामा) लिहून देत आहे.

**पी. दयाल.**

ता. ४-४-